# डिटेक्टीव्ह अल्का

## आणि रत्नजडित खंजिराचे रहस्य



सौरभ वागळे

# डिटेक्टिव्ह अल्फ़ा आणि रत्नजडित खंजिराचे रहस्य

(रहस्यकथा)

लेखक : सौरभ वागळे

sourabh238@gmail.com

sourabhwagale@yahoo.com

फोन नं- +918983234042

'मांगिरीश', आपटे मळा, कसबे डिग्रज, ता. मिरज, जि. सांगली, 416305



प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : ८ एप्रिल २०१६ (गुढीपाडवा)

# मनातले दोन शब्द...



फार काही पाल्हाळ लावत नाही. कारण जेव्हा मी वाचक असतो, तेव्हा 'लेखकाचे मनोगत' हा प्रत्येक पुस्तकातील माझा नावडता विभाग असतो आणि तो संपवून कधी एकदा कथा सुरू होते, असं मला झालेलं असतं. त्यामुळे आता मी 'लेखका' च्या रोलमध्ये आल्यानंतर मनोगतावर फार भर देत नाही. फक्त या 'अल्फा' नावाच्या बडबड्या, विचित्र, पण बुद्धिमान मुलाचा जन्म माझ्या डोक्यात कसा झाला, हे तुम्हा वाचकांशी शेअर करावंसं वाटलं. म्हणून हे मनातले दोन शब्द.

लहानपणापासूनच मला कधी सरळ विचार करायची सवय नाही. मी लहानपणी हातिम, अरेबियन नाईट्स, हॅरी पॉटर यांसारख्या कथा-कादंबऱ्या इतक्या वाचल्या होत्या आणि बॅटमॅन, सुपरमॅन आणि शक्तिमान - ज्युनियर जी सारखे शो टी.व्ही. वर इतके पाहिले होते, की प्रत्येक गोष्टीत मला जादूई, रहस्यमय किंवा ॲडव्हेंचरस असं काही काही दिसे. मला काहीतरी तुफानी साहस करावं आणि दुष्ट लोकांना धडा शिकवावा असं नेहमी वाटे. हळूहळू मोठे होईल, तसं कळू लागलं, की जादू वगैरे काही नसतं आणि त्या गोष्टींनी आपल्याला चांगलीच टोपी घातलेली आहे! पण ते रहस्यकथा आणि साहसकथांचं भूत काही डोक्यातून उतरत नव्हतं. मग मला शेरलॉक होम्स भेटला. होम्स म्हणजे अशा कथांचा खजिनाच. अक्षरशः वेडं करून टाकलं त्याने आम्हाला. मी आणि माझ्यासारखेच दोन

रहस्यकथावेडे मित्र, आमच्या इचलकरंजीच्या वाचनालयात तासनतास बसून, कोपऱ्या-कोपऱ्यात शोधून होम्सची पुस्तके वाचायचो.

मग आम्ही पुढे सरकलो आणि बरोबरीनंच टेक्नॉलॉजीसुद्धा पुढे सरकली. कॉलेजमध्ये आल्यानंतर पुस्तकांची जागा ई-बुक्सनी घेतली. टीव्हीवरच्या शक्तीमानची जागा लॅपटॉपवर बीबीसीच्या शेरलॉकने घेतली. पण डोक्यातलं वेड अजून तसंच होतं. आणि या वेडातूनच मनात रहस्यकथा तयार झाल्या आणि त्यातूनच त्यांचा नायक - 'अल्फा' चा जन्म झाला. मला रहस्य आणि साहस अनुभवता आले नाही तर काय झालं? मीच तयार केलेला 'अल्फा' तरी ते नक्कीच अनुभवेल आणि आपल्या चातुर्य आणि बुद्धिमत्तेने दुष्ट लोकांना धडा शिकवेल अशी यामागची माझी कल्पना!!

आणि अशा तऱ्हेने माझी पहिली रहस्यकथा तयार झाली - 'डिटेक्टिव्ह अल्फा आणि रत्नजडित खंजिराचे रहस्य'!! यामध्ये स्वतःला डिटेक्टिव्ह म्हणवून घेणारा अल्फा आणि त्याचा पुस्तकी किडा असलेला मित्र प्रभव यांनी सोडविलेल्या रत्नजडित खंजिराच्या गूढ केसची कहाणी तुम्हाला वाचायला मिळेल. मला खात्री आहे, की तुम्हाला ही कथा शेवटपर्यंत खिळवून ठेवेल. प्रत्येक व्यक्तीमध्ये एक असेच, माझ्यासारखे वेडे मन असते- जे अजून लहानच असते आणि कायम लहानच राहते. त्याला हिरो बनायला, साहस करायला जाम आवडत असते. या कथेची फ्रिक्वेन्सी त्या मनाबरोबर अगदी परफेक्ट मॅच होईल, अशी मला खात्री आहे.

अखेरीस, तुमच्या आणि माझ्यातला दुवा, म्हणजे अर्थातच ईसाहित्य प्रकाशन, यांचे मी शतशः आभार मानतो. केवळ त्यांच्यामुळेच ही कथा सर्वांपर्यंत पोहोचू शकली. तुमच्या - माझ्यासारख्या साहित्यवेड्या लोकांची मदत ते नेहमीच करत राहतील आणि आपणही त्यांच्या कार्यात सहभागी होत राहू, अशी सदिच्छा.

**-सौरभ वागळे**

**अर्पणपत्रिका**

*Wholeheartedly dedicated to*

My MOM & DAD

ही कथा ज्यांना अर्पण करावी, असे बरेचजण आहेत. पण सर्वप्रथम ही कथा मी माझ्या आई-बाबांना अर्पण करतो. ते जर आज असते, तर त्यांना ही माझी पहिली कथा प्रकाशित होताना पाहून खूपच आनंद झाला असता. त्यानंतर माझे आजी - आजोबा आणि मामा - मामी, जे कठीण प्रसंगी खंबीरपणे माझ्या मागे उभे होते आणि आहेत. पुढे, वेदू आणि प्रणव, माझे लाडके बहिणभाऊ ; आणि शेवटी, मला आयुष्याकडून मिळालेले एक सुंदर गिफ्ट - माझे मित्र, ज्यांच्या नावांचा उल्लेख करायला घेतला, तर अजून एक नवीन पुस्तकच तयार होईल.. या सर्वांना मी ही कथा अर्पण करतो.

सौरभ वागळे

# डिटेक्टिव्ह अल्फा

आणि

रत्नजडित खंजिराचे रहस्य

# 1.

चोवीस जुलैची ती ढगाळ संध्याकाळ होती. सांगलीच्या विश्रामबाग चौकात दाटीवाटीने भरलेली आमची रिक्षा थांबली आणि सुटकेचा निश्वास टाकत मी खाली उतरलो. रिक्षावाल्याला पैसे देऊन चालता केला आणि मी माझी बोजड स्लायडर बॅग ओढत रस्त्याकडेने चालू लागलो. सात वाजायला आले होते. सूर्य कधीच अस्ताला गेला होता. चारच दिवसांपूर्वी मला येथील वालचंद कॉलेज ऑफ इंजिनिअरिंगमध्ये ॲडमिशन मिळाले होते आणि तेव्हाच आम्ही जवळच्या परिसरातील एक रुम भाड्याने घेतली होती. मी मुळचा इचलकरंजीचा. शहरात नवीन असल्याने मला रस्ता आठवण्यास थोडे कष्ट पडले. कॉलेजच्या बाजुने थोडे अंतर चालून गेल्यानंतर मला माझी ओळखीची इमारत दिसली. - 'विश्रांती'.

खालूनच मी माझ्या पहिल्या मजल्यावरील  रुमकडे पाहिले. आतून प्रकाश दिसत होता. याचा अर्थ माझा रूममेट गावाहून परत आला होता. गेल्या आठवड्यात आम्ही रुम घ्यायला आलो तेव्हा तो बाहेरगावी गेला होता. त्यामुळे माझी आणि त्याची भेट होऊ शकली नाही. पण आमच्या बाबांचा आग्रह! 'ज्याच्याबरोबर रुम शेअर करायचीय त्याची सगळी माहिती आपल्याला असायला हवी!' त्यामुळे बाबांनी रूमच्या मालकाकडून त्या मुलाचा फोन नंबर घेतला आणि त्याला फोन करून त्याची सगळी कुंडली काढून घेतली. त्याचं बोलणं जरा विचित्रच होतं, पण एकुण तो मुलगा चांगला वाटला- अनिकेत महाजन.

कसा असेल हा मुलगा? मी विचार केला. एका अनोळखी व्यक्तीबरोबर रुम शेअर करायची म्हणजे मनाला थोडी हुरहुर लागतेच. मी तसा सुसंस्कृत आणि सभ्य लोकांच्या वर्गात मोडत असल्याने हा अनिकेत महाजन एक निर्व्यसनी आणि डोके ठिकाणावर असलेला माणूस निघावा अशी मी मनोमन प्रार्थना केली.

मी 'विश्रांती' इमारतीच्या पायऱ्या चढलो आणि माझ्या रूमचा-रुम नं 3 चा दरवाजा ठोठावला. एका तरतरीत, प्रसन्न चेहऱ्याच्या, उंचपुऱ्या, स्टायलिश केशरचना केलेल्या आणि अंगाने मजबूत दिसणाऱ्या मुलाने दार उघडले.

"प्रभव?" त्याने विचारले.

"अं.. होय. तू अनिकेत का?" मी विचारले.

"हो. ये. तुला भेटून खूप आनंद झाला." अनिकेतने मला बॅग आत आणून ठेवण्यास मदत केली. या भेटीत आनंद वाटण्यासारखे काय होते ते मला समजेना, "तसं मला 'अल्फा' म्हटलेलं जास्त आवडेल."

"अल्फा? ते का म्हणे?" मला जरा विचित्रच वाटले.

"माझे नाव 'अ' अक्षरावरून सुरू होते. 'अ'  म्हणजे मराठी भाषेतील पहिले अक्षर. तसेच इंग्रजीमध्ये माझ्या नावाचे स्पेलिंग 'A' वरुन सुरू होते, जे इंग्रजी बाराखडीतील पहिले अक्षर आहे. मग माझे टोपणनावसुद्धा कुठल्यातरी भाषेतील पहिल्या अक्षरावरून सुरू व्हायला हवे अशी माझी इच्छा होती. त्यामुळे मी हे नाव घेतले. माझ्याकडे असा चक्रावून पाहू नकोस, मला माहितीये, टोपणनाव घ्यायला ती काही बाजारातली भाजी नाहीये. पण मी माझ्या समाधानासाठी घेतले म्हण हवं तर. त्यामुळे मी स्वतःला 'अल्फा' म्हणवून घ्यायला सुरुवात केली - ग्रीक भाषेतील पहिले अक्षर! आहे ना मजेशीर? तसं फार कोणी मला अल्फा म्हणत नाही हा भाग वेगळा. ते नाव जरा विचित्रच आहे म्हणा. ग्रीक लोकांची विज्ञान आणि इतर क्षेत्रातील देणगी साऱ्या या जगाला ठाऊक आहे. अशा लोकांच्या पहिल्या

अक्षराने माझ्यासारख्या बुद्दुला हाक मारली, तर ती भाग्याचीच गोष्ट म्हणावी लागेल, नाही का?"

"हो, हो.. नक्कीच भाग्याची गोष्ट आहे! " मी जरा सटपटलोच. फोनवरदेखील याने अशाच लंब्याचौड्या गप्पा मारल्या होत्या आणि आमचा बॅलन्स संपवून टाकला होता. हा मुलगा जात्याच बडबड्या असावा असा मी अंदाज लावला.

" मी फ्रेश होतो. " त्याची बडबड सुरू राहू नये म्हणून मी म्हणालो. तसाही मला जाम थकवा जाणवत होता. मी तोंड धुतले, माझे सामान व्यवस्थित लावले, पाकिटातील नको असलेली तिकीटे, कागद कचऱ्याच्या डब्यात टाकले. माझी आवराआवर होईपर्यंत हा 'अल्फा' खुर्चीवर बसून शांतपणे माझ्याकडे पाहत होता. आमच्या फ्लॅटमध्ये दाटीवाटीच्या दोन रूम्स होत्या. त्यामुळे सामान व्यवस्थित लावणे हे एक दिव्यच होते. अखेर माझा रेनकोट मी टेबलावर ठेवला आणि खुर्चीत येऊन बसलो. अल्फा काही न बोलता वरती बघुन कसलातरी विचार करत होता. मी मघाशी त्याला असेच झटकल्यामुळे तो नाराज तर झाला नसेल ना अशी मला भिती वाटली. म्हणून मीच विषय काढला,

'तू बीएससीला आहेस तर मग? ' मला फोनवर बोललेले आठवले.

'ते बीएससी वगैरे असंच आहे. खरेतर मी एक डिटेक्टिव्ह आहे.' तो माझ्याकडे न बघताच म्हणाला. आता तर माझी जवळपास खात्रीच झाली की या मुलाचा स्क्रू जरा ढिलाच आहे. त्याच्या नकळत मी गालातल्या गालात हसलो.

'वा वा..' मी म्हणालो, 'बरं, मग डिटेक्टिव्ह म्हणजे नक्की काय करतोस तू?'

'मी पोलिसांना शोधकार्यात मदत करतो. ' तो म्हणाला. अजुनही तो तिसरीकडेच पाहत होता. मी आणखी काही विचारले असते तर मला हसूच आले असते. त्यामुळे मी थोडा वेळ शांत बसलो.

'तुला विश्रांतीची गरज आहे.' शेवटी अल्फाच माझ्याकडे बघून म्हणाला, 'तू थकलेला दिसतोयस.'

मी तेथून उठण्यासाठी कारणच शोधत होतो. ते अल्फाने आयतेच उपलब्ध करून दिल्यामुळे मी विश्रांती घेण्यासाठी उठून आत जायला निघालो. पण तेवढ्यात तो म्हणाला,

'आणि तू का थकणार नाहीस म्हणा. काल रात्रीचा पुण्याहून इचलकरंजीचा प्रवास, पुण्यातला जोरदार पाऊस, त्यातच तुझा रेनकोट हरवणं. सगळंच त्रासदायक होतं. शिवाय त्या बोजड बॅगेसोबत केलेला आजचा खडखडत्या बसमधला प्रवास. ड्रायव्हरने नेमकी आजच मेन रोड सोडून कच्च्या रस्त्यावरुन गाडी घातली. आणि त्याउप्पर रिक्षातून इथपर्यंत येताना जर उग्र वासाचा सेंट मारलेली स्त्री जवळ बसली असेल तर झालंच मग! असो. आता कॉलेजच्या निमित्ताने काहीतरी नवीन सुरू होतेय, ही तुझ्यासाठी चांगलीच गोष्ट आहे. घर सोडण्याचे दुःख असेलच, पण त्याला काही इलाज नाही. आपण आयुष्यात पुढे जात रहायला हवं. तशी तुझी काही कटकटींपासून मुक्तता झाली आहेच की. जसे की तो वेडपट प्राणायामचा क्लास, ज्याला तुझ्या बाबांनी तुझ्या इच्छेविरुद्ध घातले होते. पण तुझ्या आधीच्या लाडक्या जिमसारखी जिम मात्र सांगलीत नाहीये हे मान्यच करायला हवे. पण माझ्या माहितीत इथल्या काही जिम्स आहेत. त्या तुला पसंत पडतात का बघ. तूर्त तरी तू विश्रांतीच घे. उद्या आपण बाहेर जाऊ. "

हे सगळे ऐकून मी चाटच पडलो. माझे 'आ' वासलेले तोंड मिटेचना. पण लगेचच मला थोडा रागही आला.

" तू माझ्यावर पाळत ठेवून होतास की काय? " मी विचारले.

" नाही रे." अल्फा उत्तरला.

"मग तुला हे सगळं कसं काय ठाऊक?? "

" म्हणजे मी सगळं बरोबर सांगितलं??" त्याने उल्हासीत होऊन विचारले.

"अगदी..!! कुठेही चूक नाही. " मी थोडे गोंधळून म्हणालो.

" येस!!! याचा अर्थ मी प्रगती करतोय!! " अल्फाने खुष होऊन जवळपास उडीच मारली, " सावधान, गुन्हेगारी जगतातील लोकांनो, सांगलीमध्ये शेरलॉक होम्स पुन्हा जन्माला येतोय!! "

मी त्याचा उत्साह मावळण्याची वाट पाहू लागलो. मिनीटभराने जेव्हा अल्फाच्या लक्षात आले की मी अजुन गोंधळलेलोच आहे आणि त्याने हे सर्व कसे ओळखले हे जाणून घेण्यासाठी उत्सुक आहे, तेव्हा तो म्हणाला,

" अरे फारसे अवघड नव्हते हे. याला तर्कशास्त्र म्हणतात. तू इथे आल्यानंतर तुझे निरीक्षण करून मी हे सर्व अनुमान काढले. तू कचऱ्याच्या डब्यात जे कागदाचे चिटोरे टाकलेस, त्यात काल रात्रीचे पुणे ते इचलकरंजीचे तिकीट होते. म्हणजेच तू पुण्याला गेला होतास आणि काल रात्रीच परत आला आहेस. जागरणाने थोडे लाल झालेले तुझे डोळेही तेच सांगतायत. तू जो रेनकोट हातातून आणलास त्यावर पुण्यातील एका सुप्रसिद्ध दुकानाचे लेबल आहे आणि तो अजून न वापरल्यासारखा चकचकीत आहे. म्हणजेच तो परवाच घेतला असणार आणि पुण्यात घेतला असणार. मग तुला पुण्यात रेनकोट घेण्याची गरज का पडली? कारण एकतर तू रेनकोट जाताना बरोबर घेतलाच नसणार, किंवा तिकडे जाऊन तू हरवला असणार. सध्या पुण्यात जोरदार पाऊस सुरू आहे. त्यामुळे जाताना रेनकोट बरोबर घेण्याएवढा शहाणा तू असशील असे मी गृहीत धरले आणि तसा तू निघालासही.

पुढे खडखडत्या बसबद्दल म्हणशील तर त्याला तर डोके लावण्याची गरजच नव्हती. कारण इचलकरंजी - सांगली मार्ग चौपदरीकरणाच्या कामामुळे कालपासून बंदच आहे आणि सगळया गाड्या दुसऱ्या कच्च्या मार्गावरूनच येतायत. याखेरीज तू आलास तेव्हा तुझ्या अंगाला लेडीज परफ्यूमचा वास येत होता. तो तू तर नक्कीच लावला नसणार. याचा

अर्थ रिक्षामध्ये एखादी भरपूर परफ्यूम मारलेली बाई तुझ्या बाजूला बसलेली असावी. आहे ना सुसंगत सगळं? "

मी तर थक्कच झालो.

" अनबिलीव्हेबल! " मी म्हणालो, " हे सर्व ठिक आहे, पण तो प्राणायामचा क्लास आणि जिम? तो क्लास माझा नावडता होता आणि जिम आवडती होती हे तुला कसे काय कळाले? ते तर मी कुठे बोललोही नव्हतो! "

" तेही तू कचऱ्यात टाकून दिलेल्या कागदांवरुनच मला कळाले. " अल्फा हातात कागदाचे दोन चिटोरे नाचवत म्हणाला, "या दोन्ही ठिकाणच्या सोडचिठ्ठ्या आहेत. यातली प्राणायामचा क्लास सोडल्याची पावती तू पाकिटातून काढून लगेच टाकून दिलीस. पण जिमची पावती टाकण्याआधी तू थोडा विचार केलास आणि मग ती न टाकता तू व्यवस्थित बाजूला ठेवून दिलीस. यातून हेच स्पष्ट होत नाही का, की तुला तो प्राणायामचा क्लास नको होता, पण जिम हवी होती! "

" अफलातून!! " मी प्रभावित होऊन म्हणालो, " भन्नाटच दिसतोयस तू! "

" धन्यवाद धन्यवाद!! " अल्फा स्तुती स्वीकारत म्हणाला, " मी नेहमी असे तर्क करत असतो. पण ते इतके कधी बरोबर येत नाहीत. वा! आजचा दिवस डायरीत लिहून ठेवायलाच पाहिजे. "

" तू इतका हुशार आहेस तर कॉलेजचा टॉपरच असशील. " मी म्हणालो. (मी स्वतः माझ्या कॉलेजचा टॉपर होतो.)

" छे रे! उलट मी तर कॉलेजमधील सर्वात मठ्ठ मुलगा आहे. " अल्फा हसून म्हणाला, " माझा तर्क ढिग असेल चांगला. पण आपलं डोकं अभ्यासात काही चालत नाही बुवा. तुला खरं सांगू का मित्रा? मला अभ्यास करावा, परिक्षेत पहिला यावं असं कधीच वाटत नाही. माझं मन भिरभिरत असतं नेहमी. मला आयुष्यातील रहस्यांचा शोध घ्यावासा

वाटतो-जी अभ्यासापेक्षा निश्चितच चित्तथरारक असतात... मनोवेधक... विचित्रच योगायोग आहे ना? तुझ्यासारखा टॉपर मुलगा आणि माझ्यासारखा विक्षिप्त आणि विचित्र मुलगा, दोघेही एकाच रुममध्ये यावेत? इथे तू राहिलास तर केवळ दोनच गोष्टी होऊ शकतात - एकतर तू महिन्याभरात कंटाळून रुम सोडशील, नाहीतर आपली मैत्री इतकी घनिष्ठ होईल, की आपल्याला एकमेकांशिवाय करमणार नाही."

मी उत्तरादाखल हसलो.

"असो." अल्फा म्हणाला, "उद्यापासून तुमचं कॉलेज सुरू होणार. लेक्चर्स, अभ्यास, परिक्षा.. सरळ साधे निरुपद्रवी जीवन. तसे पहायला गेले तर जीवन नेहमीच सरळमार्गी असते ; जर आपण सरळच मार्गाने गेलो तर. पण जीवनातले आडमार्ग खुपच भन्नाट असतात. कैक प्रकारची संकटे, धोके, रहस्ये आणि दुःखही भेटेल तुम्हाला. पण त्यावरून चालण्यात जी मजा आहे ती सरळ साधे जीवन जगण्यात नाही. कसे जगायचे, हे मात्र आपल्यावर अवलंबून आहे. मला तर बुवा 'आपण भलं, आपलं काम भलं' अशी विचारसरणी जमत नाही. दुसऱ्यांच्या भानगडीत नाक खुपसायची मला भारी सवय आहे. मी तुला निश्चितच असे अनुभव देऊ शकेन, जे याआधी तू कधीच अनुभवले नसशील.. अर्थात, जर तू तुझ्या अभ्यासातून वेळ काढलास तर! "

" मी नक्कीच प्रयत्न करेन. " मी म्हणालो, " बाय द वे, तू मुळचा आहेस कुठला? त्याबद्दल तू काहीच सांगितले नाहीयेस. "

" आता हा विषय निघाला की परत माझी बडबड सुरू होईल. त्यामुळे सध्या तरी हा प्रश्न तुझ्या मनातच ठेव. कारण आता जेवायची वेळ झालेली आहे. " खुर्चीवरून उठत अल्फा म्हणाला, " चल, आवर तुझं. निघायला हवं आपल्याला. "

त्याने हा विषय टाळल्याचे पाहून मला आश्चर्य वाटले. त्याचे म्हणणेही चूक नव्हते म्हणा. त्याने पुन्हा बडबडायला सुरुवात केली, की आणखी अर्धा - पाऊण तास फुकट गेला असता. त्यामुळे मीही काही न बोलता तयार झालो. अल्फाबद्दलचे माझे मत आता

संदिग्ध झाले होते. तो खरोखरीच डिटेक्टिव्ह वगैरे होता का? की असेच हवेत गोळया मारणारा बोलबच्चन होता? त्याने मघाशीच केलेले तर्क - अनुमान त्याच्या बुद्धिमत्तेची झलक दाखवित होते खरे ; पण अंदाज कधी कधी बरोबर येऊ शकतातच की. माझ्या बाबांना जर कळाले असते की मी एका डिटेक्टिव्हगिरी करणाऱ्या मुलासोबत राहतोय तर त्यांनी दोनच दिवसांत मला नवीन रुम शोधून दिली असती. (बाबांची इच्छा - माझ्यासोबत राहणारा मुलगादेखील टॉपरच असावा!) तरीही मी तेथेच राहण्याचे ठरवले. अल्फा जरी विचित्र असला तरीही तो विश्वास ठेवण्याजोगा वाटत होता. त्यामुळे थोडे दिवस थांबायला काय हरकत आहे, असा मी विचार केला. अल्फा म्हणाला त्याप्रमाणे शेवटी दोन्हीपैकी एक काहीतरी होणारच होते - एकतर घनिष्ठ मैत्री, नाहीतर दुसरी रुम! अखेर माझा निश्चय पक्का करीत मी अल्फासोबत जेवायला बाहेर पडलो.

***

## 2.

कॉलेज सुरू होऊन आठवडा होऊन गेला. या आठवड्याभरात मला जाणवले की, अल्फा विक्षिप्त होता खरा, पण त्याचा विक्षिप्तपणा त्रासदायक नव्हता. त्याच्या कृती एखाद्या सामान्य माणसासारख्या नव्हत्याच. तो सतत कोणत्या ना कोणत्या तरी गोष्टीचे निरीक्षण करत असायचा. अभ्यासापेक्षा इतर गोष्टींची त्याला इतरांपेक्षा सखोल माहिती होती. वायफळ बडबड तर नॉनस्टॉप असायची. काही वेळा तत्वज्ञानही असायचे. पण ती डोकेदुखी होत नव्हती. माझी तर जाम करमणूक व्हायची. अल्फाची आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट म्हणजे, त्याचे 'शेरलॉक होम्स' वरचे अपरंपार प्रेम! मी शेरलॉक होम्सबद्दल फारसे वाचले नाहीये आणि मला 'होम्स एक काल्पनिक गुप्तहेर होता' यापलीकडे काहीही माहिती नाहीये, हे ऐकून अल्फाने मला वेड्यातच काढले.

"शेरलॉक होम्सबद्दल माहीत नसलेल्या लोकांनी दुसऱ्या ग्रहावर रहायला जावे!! " अल्फाने स्टेटमेंट मारले, " असा कसा रे तू टॉपर? अभ्यासाच्या पुस्तकांव्यतिरीक्त दुसरं काही वाचलंयस की नाही तू?? आणि शेरलॉक होम्सतर किती प्रसिद्ध नाव आहे. त्याबद्दल तुला यथातथाच माहिती कशी? "

" त्यात काय एवढं!! मला काही फार इंटरेस्ट नाही बाबा अवांतर वाचनात." मी म्हणालो, "आणि अभ्यासातून वेळ मिळाला तर वाचणार ना. तो होम्स काही मला पेपरला गणिते सोडवायला मदत करणार नाहीये. त्यामुळे मी मला जे आवश्यक आहे तेच वाचतो."

"खुपच निरस आहेस तू! " अल्फा उद्गारला, " शेरलॉक होम्सबद्दल माझ्यासारखा माणूस काय बोलणार? सर आर्थर कॉनन डॉयलचा मानसपुत्र तो. निरीक्षण - निष्कर्ष शास्त्राचा जनक. गुन्हे संशोधन क्षेत्राचा अनभिषिक्त राजा! त्याला लोकांनी इतकं डोक्यावर घेतलं, की ती व्यक्तिरेखा काल्पनिक होती हेच लोक विसरून गेले. त्याची गुन्हे संशोधनाची पद्धत आजही पोलीस आदर्श म्हणून वापरतात. एकोणिसाव्या शतकात सर डॉयलनी लिहीलेल्या शेरलॉक होम्सच्या रहस्यकथा आजही तितक्याच ताज्या वाटतात. आख्खं जग वेडं आहे शेरलॉक होम्ससाठी, आजही. पण काय दुर्दैव! तुझ्यासारखे होम्सची माहिती नसणारे लोकही जगात आहेत! "

मी तर वैतागलोच. हे 'होम्सपुराण' रोजचंच होतं. पण हळूहळू मलाही त्याची सवय झाली. पण एक गोष्ट मात्र होती - अल्फाच्या डिटेक्टिव्हगिरीचा अजून मला प्रत्यय आला नव्हता. पण लवकरच एक सनसनाटी रहस्य आमच्या समोर उभे ठाकणार होते आणि अल्फाच्या बुद्धीचा कस लागणार होता.

अशीच एक मंगळवारची ढगाळलेली संध्याकाळ होती. दोन तीन दिवस पाऊस पडला नव्हता; पण ढगांचे आच्छादन कायम होते. आमच्या मेसमधून रात्रीचे जेवण

उरकून मी आणि अल्फा रूमवर परतलो. दहा वाजायला आले होते. अल्फा कानात हेडफोन घालून निवांत गाणी ऐकत बसला. मी आपले 'बेसिक मेकॅनिकल इंजिनीअरिंग' चे पुस्तक उघडले. कॉलेजमध्ये शिकविण्याआधीच वाचायची माझी सवय होती. मी पानभरही वाचले नसेल, इतक्यात अल्फाचा सेलफोन खणाणला.

"हॅलो.." अल्फा बोलला, "शुभसंध्या! बोल रामू."

मग पुढची काही मिनिटे तो फक्त ऐकत राहिला. मध्ये मध्ये 'हं', 'बरं' असे तुटक शब्द तो वापरत होता. मी नुसताच त्याच्याकडे टकामका पाहत होतो. अल्फाने जेव्हा फोन ठेवला, तेव्हा त्याचा चेहरा चांगलाच गंभीर झाला होता. पण त्याचे डोळे मात्र उत्साह आणि उत्सुकतेने भरून गेले होते.

"कोणाचा होता रे फोन?" मी विचारले.

"माझा एक खास मित्र." अल्फा म्हणाला, "खुपच उत्कंठावर्धक गोष्ट सांगितलीय त्याने आत्ता मला."

"काय म्हणाला तो? " मी विचारले. अल्फा झटकन उठला आणि त्याने कपडे बदलायला सुरूवात केली.

" प्रकरण तसं गंभीर आहे. पण मी खुष आहे. बऱ्याच दिवसांनी  काहीतरी इंटरेस्टिंग समोर येतेय." अल्फा म्हणाला. माझ्या चेहऱ्यावरील या प्रश्नचिन्ह पाहून तो पुढे म्हणाला, "मी तुला परवा म्हणालो नव्हतो का - 'आडमार्ग'!" अल्फाने आपले सामान कपाटात टाकले आणि केसबिस व्यवस्थित केले.

"आणि तू कुठे निघालायस आत्ता? " मी गोंधळून विचारले.

" सांगलीच्या गांवभागात. " अल्फा उत्तरला. त्याची बाहेर जाण्याची सगळी तयारी झाली आणि मग त्याने मला विचारले, " तू येतोयस? "

" अरे पण मला कळू तरी दे काय प्रकार आहे ते! "

" ते मी जाताना वाटेत सांगेनच. हा आडमार्ग आहे प्रभव. तू जर आत्ता इथे बसून तुझे पुस्तक वाचणे पसंत केलेस, तर तुझी वेळ नेहमीप्रमाणेच, सरळ जात राहिल. पण मी जिकडे निघालोय तिकडे, मी तुला हमी देतो, की तुला नक्कीच एखादा रोमांचक अनुभव मिळेल. विचार कर. तुला फक्त माझे बूट घालून होईपर्यंतच वेळ आहे. "

मी घाईघाईने बूट घालणाऱ्या अल्फाकडे पाहतच राहिलो. क्षणभर विचार केला आणि मग पुस्तक मिटून बाजूला फेकले.

"शाबास! मला अपेक्षा होतीच, की तुला त्या बोअरींग पुस्तकापेक्षा माझ्यासोबत यायला जास्त आवडेल. आणि ती तू फोल ठरवली नाहीस." अल्फा हर्षोल्हासित होऊन म्हणाला, "मी तुला आणखी एक मिनीट देतो, आवरण्यासाठी. आत्तापर्यंत आपण खाली असायला हवे होते. आधीच खुप उशीर झालाय."

मिनीटभरात मी आवराआवर केली आणि झपाझप पावले टाकत आम्ही खालच्या रोडवरून चालू लागलो. मेन रोडला आम्ही एक रिक्षा पकडली.

"गांवभागातला राजवाडा." अल्फा म्हणाला. रिक्षा सुरू झाली. मग पुढचे मिनिट शांततेतच गेले. मग न राहवून मी विचारले,

" आता मला सांग, नक्की काय झालंय? "

" सांगलीच्या राजवाड्यातील म्युझियममध्ये खून झालाय. " अल्फा गंभीरपणे म्हणाला. माझ्या छातीत धस्स झाले, "तिथल्या रखवालदाराचा खून झालाय, आणि म्युझियममधील शेकडो वर्षे जुना आणि अतिशय मौल्यवान असा एक रत्नजडित खंजीर चोरीला गेलाय."

" काय?? " मी डोळे विस्फारून म्हणालो.

" होय. म्युझियमच्या चेअरमननी तर धसका घेऊन अंथरुणच धरलंय. खुपच गंभीर घटना. "

" मग आत्ता आपण म्युझियमकडेच निघालोय का? "

" होय." अल्फा तुटकपणे म्हणाला. मला पुढे काही विचारवले नाही. दहा मिनिटे आम्ही तसेच गप्प बसून राहिलो. रिक्षा गांवभागाच्या दिशेने धावत होती. रात्र असल्यामुळे रस्त्यांवर फारशी रहदारी नव्हती आणि शिवाय आमची रिक्षादेखील वेगात असल्याने थोड्याच वेळात आम्ही राजवाड्याच्या समोर आलो. रिक्षावाल्याचे पैसे चुकते केले आणि आम्ही राजवाड्याच्या दिशेने चालू लागलो. सांगलीचा राजवाडा भव्य होता. त्याच्या मागील बाजूस हे म्युझियम होते. खरे तर तो राजवाड्यातील एक महालच होता, पण आता त्याचे संग्रहालयात रुपांतर करण्यात आले होते. जुन्या पद्धतीची बांधणी, रात्रीची शांतता आणि त्यातच भर म्हणून असा भयानक प्रसंग, या सर्वांमुळे ते संग्रहालय भेसूर वाटत होते.

आम्ही संग्रहालयाच्या महालापासून थोड्या अंतरावर उभे राहिलो. अल्फा विचारांत गढलेला असल्यामुळे मी त्याच्याशी न बोलता राजवाड्याचे निरीक्षण करीत राहिलो. अल्फा संग्रहालयात का जात नाहीये, असा मला प्रश्न पडला होता. पण तो बहुधा कोणाचीतरी वाट पहात असावा. दोनच मिनीटांत आमच्या समोर एक किंमती फोक्सवॅगन येऊन उभारली. त्यातून एक बऱ्यापैकी वृद्ध, काळया - पांढऱ्या अशा संमिश्र केसांचा, थोड्याशा सुरकुतलेल्या चेहऱ्याचा, धारदार व तीक्ष्ण डोळयांचा आणि दणकट शरीरयष्टी असलेला माणूस उतरला. त्याने इकडेतिकडे पाहिले आणि आम्ही दिसताच तो आमच्या दिशेने आला.

"अरे देवा! हा अल्फा तर नाही ना? " अंधारात आमचा अंदाज घेत त्यांनी विचारले.

" हो, मीच आहे, वाघमारे सर. " अल्फा पुढे होत म्हणाला. वाघमारेंच्या चेहऱ्यावर आश्चर्य आणि वैताग असे दुहेरी भाव होते. अल्फाने मला ओळख करून दिली, " प्रभव, हे या जिल्ह्याचे पोलीस अधीक्षक श्री. वाघमारे. "

पण वाघमारेंना या शिष्टाचारांमध्ये स्वारस्य नव्हते. ते ताडकन् म्हणाले, "तुला ही गोष्ट कशी काय कळाली? अजून तर  बाकीच्या पोलिसांनाही काही ठाऊक नाहीये."

" मला माहिती मिळवणं फारसं अवघड नाहीये सर. माझे मित्र सर्वत्र आहेत. " अल्फा स्मित करीत म्हणाला.

" रामू! मूर्ख कुठला! त्याला बघतोच जरा मी " वाघमारे म्हणाले, " आणि हा कोण? याला कशाला घेऊन आलायस सोबत?"

"हा माझा नवीन रुममेट आणि मित्र, प्रभव." अल्फा म्हणाला. वाघमारेंनी माझ्याकडे एक जळजळीत कटाक्ष टाकला.

"हे बघ पोरा. तुझं आत्ता इथं येणं मुळीच अपेक्षित नाहीये. तू नेहमीच आमच्या कामात लुडबुड करीत असतोस. पण हे प्रकरण अतिशय संवेदनशील आणि गोपनीय आहे. या घटनेबद्दल लोकांना कळाले तर मोठे संकट कोसळेल. त्यामुळे तू इथून काढता पाय घ्यावास हेच उत्तम. आणि या तुझ्या नव्या मित्रालाही घेऊन जा. "

" पण सर, मी ज्या प्रकरणांमध्ये लुडबुड करतो, ती प्रकरणे लगेच सुटतात हेदेखील तितकंच खरं आहे, नाही का?" अल्फा मिश्कीलपणे म्हणाला, "आणि शिवाय केलेल्या मदतीची मी कुठे वाच्यताही करत नाही. दरवेळी श्रेय तुम्हालाच जाते आणि नाव तुमचेच होते. बरोबर आहे ना?"

" काही बरोबर वगैरे नाही! " ते खेकसले, " आणि ती प्रकरणे लगेच सुटतात कारण त्यामागे माझी कर्तबगारी असते, तुझी मदत नव्हे!" त्यांनी एकवार संग्रहालयाकडे पाहिले आणि डोक्यावरून जोरात हात फिरवला.

" मी काय करतोय इथे!! " मग ते अल्फाकडे वळले, " बरं, ठिकाय. ये बाबा. भांडायची ही काही योग्य वेळ नाही. उगीच फुकट माझ्या डोक्याला ताप नको. पण लक्षात ठेव - याबद्दल कुठेही काहीही बोलायचं नाही. जे काही असेल ते गुपचूप करायचं,समजलं? आणि तुझ्या या नव्या मित्रालापण सांग. "

"माझ्यावर विश्वास ठेवल्याबद्दल धन्यवाद, सर. या गोष्टीची कुणाला कानोकान खबर जाणार नाही, याची पूर्ण काळजी मी घेईन." अल्फा गालातल्या गालात हसत म्हणाला. त्याचे बोलणे संपेपर्यंत वाघमारे संग्रहालयाच्या दिशेने निघालेही होते, "घडलेल्या प्रसंगाबद्दल मला खुपच पुसट माहिती आहे. मला सविस्तर सांगा ना सर, काय घडले ते. हा प्रसंग घडला कधी?"

"साधारणतः अर्धा तास आधी." चालता चालता वाघमारे म्हणाले, "खुपच भयानक संकट कोसळले आहे संग्रहालयाच्या समितीवर. तो खंजीर म्हणजे सांगलीच्या म्युझियमचे भूषण होते. जवळपास दिडशे वर्षे जुना. त्यावर त्या काळातले तीन हिरे आणि चार माणके, अशी मिळून एकूण सात बहुमूल्य रत्ने होती- खंजिराच्या मुठीवर. गेल्या सत्तर वर्षांपासून तो संग्रहालयात सुरक्षित होता. पण आत्ताच अर्ध्या तासापूर्वी तो तेथून गायब झालाय. म्युझियमच्या संचालकांचा मला तातडीचा फोन आला होता. ते तर जवळपास रडकुंडीलाच आले होते. त्यांनी अक्षरशः गयावया केली आहे. ही बातमी जर फुटली, तर संग्रहालयाच्या समितीवर खुप मोठी कुऱ्हाड पडेल. त्यामुळे हे प्रकरण गुप्त ठेवण्याच्या अटीवर मी येथे आलोय."

"ठिक आहे सर. मी यात तुम्हाला योग्य ती मदत करेन."

वाघमारेंनी गंभीरपणे मान डोलावली.

***

# 3.

आम्ही महालापाशी पोहोचतो न पोहोचतो तोच एक माणूस धावतच आमच्यापाशी आला आणि वाघमारेंचे पाय धरत म्हणाला,

"वाघमारे साहेब... वाघमारे साहेब, मला वाचवा!! खुप भयानक संकट कोसळले आहे हो माझ्यावर.. संग्रहालयाची जबाबदारी माझ्यावर आहे हो.. या घटनेसाठी मला जबाबदार धरले जाईल! मी कुटुंब असलेला माणूस आहे साहेब.. उद्या माझ्याबरोबर काय होईल सांगता येत नाही.. काहीतरी करा साहेब, काहीतरी करा!! "

" शांत व्हा सावंत, शांत व्हा.. " वाघमारेंनी त्यांना उठवून त्यांची समजूत घातली, " आम्ही तुमच्या मदतीसाठीच धावून आलो आहोत. आपण नक्कीच यातून काही मार्ग काढू."

श्री. सावंतांनी आपला घामाने थबथबलेला चेहरा पुसला. ते अपादमस्तक थरथरत होते. वाघमारेंनी रखवालदाराच्या मदतीने त्यांना आत नेऊन बसवले आणि प्यायला पाणी दिले. पाणी पिल्यानंतर सावंत थोडे शांत झाले.

"मला प्रथम सांगा, की ही घटना घडलेली आहे, हे माहीत असणारे आपल्याव्यतिरीक्त आणखी कोण कोण  आहे? "

" फक्त चेअरमन साहेब. आपल्याव्यतिरीक्त फक्त त्यांनाच ही गोष्ट कळालेली आहे. ते आजारपणामुळे आधीच घरी झोपून होते. त्यातच ही बातमी ऐकून त्यांनी हाय खाल्ली आहे. त्यांची तब्येत सध्या खुपच बिकट अवस्थेत आहे. "

" मग त्यांनी ही गोष्ट कोणाला सांगितली असेल काय? "

" नाही नाही.. त्यांनी मला वचन दिलंय. अगदी डॉक्टरांनाही कळत नाहीये की चेअरमनसाहेबांची तब्येत अशी अचानक का बिघडली. पण साहेबांनी ही बातमी फुटू दिली नाहीये. " सावंत म्हणाले.

" नाव काय आहे चेअरमनसाहेबांचं? " अल्फाने विचारले.

" सुधाकर लिमये. " श्री. सावंत म्हणाले.

" आपल्या सर्वां-व्यतिरीक्त आणखी एक अशी व्यक्ती आहे, जिला हा प्रसंग कसा घडला, याची आपल्यापेक्षा निश्चितच अधिक चांगली माहिती आहे; आणि ती व्यक्ती म्हणजे गुन्हेगार, ज्याला आपण शोधायचं आहे. " वाघमारे म्हणाले, " रखवालदार, तू मला खुनाची जागा दाखवू शकतोस का? "

" हो.. हो साहेब.. चला.. " रखवालदार तर चांगलाच गांगरून गेला होता. त्याने आम्हा तिघांना आतमधल्या दालनात नेले. तेथे कित्येक जुन्या, ऐतिहासिक वस्तू काचेच्या पेट्यांत बंद केलेल्या अवस्थेत होत्या. एरवी मला त्या पहायला नक्कीच आवडल्या असत्या. पण सद्यस्थितीत त्या दालनात लक्ष वेधून घेणाऱ्या फक्त दोनच गोष्टी होत्या. एक - दालनाच्या मधोमध असणारी रत्नजडित खंजिराची सताड उघडी पडलेली रिकामी पेटी ; आणि दोन - त्या पेटीलगतच खाली रक्ताच्या थारोळ्यात पडलेला एक मृतदेह!!

माझ्या डोळ्यांसमोर दोन क्षण अंधारीच आली. अंगावर शिरशिरी आणणारे ते भयानक दृश्य पाहून मी माझे डोळे बंद करून घेतले. असे काही पाहण्याचा प्रसंग माझ्यावर पहिल्यांदाच आला होता. वाघमारे आणि अल्फा त्या मृतदेहाजवळ गेले. त्या

रखवालदाराच्या छातीत धारदार सुरा खुपसून त्याचा खून करण्यात आला होता. छातीमध्ये सुरा तसाच होता. अतिरक्तस्रावामुळे त्याचा मृत्यू झाला असावा.

वाघमारे आणि अल्फाने त्या देहाची, तसेच त्या दालनाची तपासणी केली. मला तर ताबडतोब तेथून बाहेर पडण्याची इच्छा होत होती. पण कसेबसे मी स्वतःला रोखून धरले.

"घटना ज्यावेळी घडली, तेव्हा तू इथेच होतास? " वाघमारेंनी दुसऱ्या रखवालदाराला विचारले.

" होय... होय साहेब... मी.. मी गेटपाशी उभा होतो."

"मग मला सविस्तर सांग, इथे काय घडलं आणि तू काय पाहिलंस ते. "

"साहेब, माझं नाव तुकाराम माळी. मी गेली दोन वर्षे या संग्रहालयाची रखवाली करतो. इथे रखवालदार तीन वेळांत काम करतात. एका वेळी दोघेजण. संग्रहालयातील सर्व वस्तू फायबरच्या काचपेटीत बंद असल्यामुळे सुरक्षेसाठी फारसे मनुष्यबळ लागत नाही. आज रात्री रखवाली करण्याची जबाबदारी आमची होती, मी आणि हा पाटील. मी समोरच्या आणि हा पाटील मागच्या गेटपाशी उभा होता. दहा वाजण्याच्या सुमारास, बहुधा पावणेदहा असावेत, हा पाटील पुढच्या गेटला आला. तासभर एकटे उभे राहून आम्ही कंटाळलो होतो. त्यामुळे पाच - दहा मिनिटे असेच गप्पा मारत उभारलो. मध्येच पाटलाला कसलातरी आवाज ऐकू आला म्हणे. मला तर काहीच जाणवले नव्हते. बहुधा माझे लक्ष नसावे. पाटलाचे कान तीक्ष्ण होते, हे मी कधीही मान्य करेन. मग तो म्हणाला, तू इथेच थांब. मी जरा आतमधली पाहणी करून आलो. मी त्याला हो म्हणालो. तो आत गेला तो गेलाच.. पाच मिनिटे झाली, दहा मिनिटे झाली, तरी हा बाहेर यायला तयारच नाही. मग मी स्वतःच आत येऊन पाहिलं, तर.... "

माळी तेथेच थांबला. पुढचे बोलण्याचे त्याचे धाडसच झाले नाही. अल्फाने त्या उघड्या पडलेल्या काचपेटीचे सखोल निरीक्षण केले. त्या पेटीला कुठल्याही बाजूने

आघात झाल्याचे किंवा तोडण्याचा प्रयत्न झाल्याचे निशाण नव्हते. फक्त त्या पेटीचे लॉक मात्र ओपन होते आणि किल्ली त्यालाच लागून राहिली होती. आतमधला रत्नजडित खंजिर गायब होता.

"या सगळया पेट्यांच्या लॉकच्या किल्ल्या ठेवण्याची जागा कोणती आहे? " अल्फाने विचारले.

" चेअरमन साहेबांची केबिन. " माळी म्हणाला, " तिथल्या कपाटात या सर्व पेट्यांच्या चाव्या असतात. "

" मी त्या पाहू शकतो का? "

" हो, हो. या ना साहेब. दाखवितो. "

माळीने आम्हाला चेअरमनच्या केबिनमध्ये नेले. ती केबिन खुपच टापटीप होती. जमिनीवर मऊ गालिचा अंथरला होता. माळीने कपाट उघडले आणि ड्रॉवर बाहेर काढून त्यामागचा चोरकप्पा दाखविला. त्यामध्ये बऱ्याच किल्ल्या जुडग्यामध्ये एकत्र बांधल्या होत्या.

" विचित्र..." अल्फा पुटपुटला.

"काय? " मी विचारले. अल्फाने नकारार्थी मान डोलावली. त्याच्या चेहऱ्यावरूनच दिसत होते, की त्याच्या मनातील विचार किती वेगाने धावत असतील..

" हं.. म्हणजे इथून गुन्हेगाराने चावी मिळविली. " फारच हुशार दिसतोय हा माणूस! माझ्या मते आपण या केबिनची तपासणी करायला हवी."

"होय, होय. अगदी योग्य बोललात सर. " अल्फाने सहमती दर्शविली. ते दोघे मिळून केबिनची तपासणी करू लागले. मीही, जरी मला काय शोधायचे हे ठाऊक नसले तरी, इकडे तिकडे काही दिसते का ते पाहू लागलो. त्या कपाटावर किंवा दरवाजावर

गुन्हेगाराने कोणतेच निशाण सोडले नव्हते. अल्फा चेअरमनच्या टेबलापाशी शोधू लागला. अचानक चमकून त्याने खाली वाकून पाहिले.

"इथे काहीतरी आहे! " तो वाघमारे सरांना म्हणाला. त्याने आपल्या खिशातून भिंग काढले आणि टेबलाजवळच्या गालिचाचे नीट निरीक्षण केले. वाघमारेही वाकून पाहू लागले.

" इथला गालिचा दबला गेलाय. " वाघमारे म्हणाले, " माळी, या केबिनमध्ये आज कोणी बराच वेळ थांबलेलं होतं का? "

" नाही साहेब. सकाळी सफाई कामगार स्वच्छता करून गेला. मग सावंत साहेबांनी थोडा वेळ काम पाहिलं. त्यानंतर कोणीच नाही आलेलं. चेअरमनसाहेब आजारी असल्याने गेले काही दिवस केबिन रिकामीच आहे. "

" मला खात्री आहे, की हा गालिचा श्री. सावंतांमुळे दबलेला नाहीये. इतक्या वेळात तो पुन्हा पूर्ववतही झाला असता. हे काही वेळापूर्वीचेच निशाण आहे. इथे नक्कीच खुनी उभा राहिला असला पाहिजे. " वाघमारे म्हणाले.

" उभा नाही सर, बसला असला पाहिजे. " अल्फाने सुचविले, " गालिचा वरवर नाही, तर चांगलाच खोल दबला गेलाय. त्याअर्थी त्यावर नक्कीच जास्त भार पडला असणार. आणि शिवाय, खुनी गालिचा एवढा खोल दबला जाईपर्यंत तसाच मख्खपणे उभा राहिल, हे मला नाही पटत. "

" हं .. कदाचित असेच असेल." वाघमारे विचार करीत बोलले, "पण मग तो बसला तरी का? त्याचे काम फक्त इतकेच होते, की कपाटातून चावी मिळविणे, बाहेरच्या पेटीचे लॉक काढणे आणि खंजीर घेऊन पळून जाणे. पण हे टेबल तर कपाटापासून जवळपास तीन मीटर तरी लांब आहे. मग तो इकडे का आला??"

अल्फाने आणखी खाली वाकून टेबलाखाली काही आहे का ते पाहिले. पण त्याला काहीच दिसले नाही. मग खालचा ड्रॉवर उघडला. त्यातही सर्व सामान जागच्या जागी होतेे. वाघमारेंच्या प्रश्नाचे उत्तर काही अल्फाला सापडेना. मग त्याने टेबलाचे निरीक्षण केले. ते टेबल एकसंध, पांढऱ्या रंगाचे आणि लाकडी होते. त्या टेबलाच्या बाजूच्या भागाकडे, दबलेल्या गालिचाच्या वरच्या बाजूला अल्फाने बोट दाखविले. मी जवळ जाऊन पाहिले, तेव्हा मला त्या पांढर्‍या पृष्ठभागावर थोडेसे काळपट डाग पडलेले दिसले. अल्फा आपल्या भिंगातून त्या डागांचे निरीक्षण करू लागला. अगदी अस्पष्ट होते, पण नुकतेच पडल्यासारखे वाटत होते. अल्फाने प्रथम आपल्या मोबाईलमध्ये त्या डागांचा फोटो काढला. मग त्यावरून हलकेच बोट फिरविले. त्याचे बोटही काळे पडले. बहुधा तो कसलातरी काळा तेलकट पदार्थ होता. अल्फाने त्याचा वास पाहिला. मी बराच वेळ त्याची कृती पहात होतो. पण त्या डागांमध्ये त्याला काय मिळाले आहे, हे मला समजत नव्हते. जेव्हा अल्फाने आपल्या बोटाचा वास घेतला, तेव्हा तो जास्तच गोंधळात पडलेला मी पाहिला.

मग अल्फाने त्या केबिनचा थोडा अंदाज घेतला. दरवाजासमोर बरोबर कपाट होते. कपाटाला लागूनच आलिकडे भिंतीत खिडकी होती. त्यामधून मंद असा चंद्रप्रकाश केबिनमध्ये येत होता. डाव्या बाजूला कपाटापासून थोड्या अंतरावर टेबल होते. तो दबलेला गलिचाचा भाग टेबलाच्या दुसऱ्या बाजूला, म्हणजे कपाट ज्या बाजूला होते, त्याच्या बरोबर विरूद्ध बाजूला होता. अल्फाने ती केबिन मनात साठवून ठेवली.

"काही विशेष मिळाले का रे? किती वेळ इथेच घुटमळतोयस! " वाघमारेंना तेथून बाहेर पडायची घाई झाली होती.

" नाही सर. मला फार काही वेगळे मिळाले नाही. " अल्फा म्हणाला. आम्ही चौघेजण केबिनच्या बाहेर आलो. मग अल्फाने त्या महालाचा उरलेला भाग तपासला. पुढे, मागे, इकडे, तिकडे. मी त्याच्या मागे मागेच होतो. त्या महालाच्या मागील बाजूच्या खिडकीपाशी तो बराच वेळ थांबला. तेथेही त्याने मघासारखाच फोटो काढून घेतला. ते झाल्यानंतर आम्ही पुन्हा मुख्य कक्षात आलो. मग अल्फाने त्या मृत रखवालदाराच्या देहाची

पुन्हा एकदा तपासणी केली. वाघमारे अल्फाकडे 'हा काय शहाणाच समजतोय फार स्वतःला' अशा अविर्भावात पहात होते. अल्फा चेहऱ्यावरून तरी काही दर्शवित नव्हता. पण त्याचे मन बऱ्याच गोष्टींची नोंद घेत असावे, असे मला वाटले.

"श्री. माळी, तुमच्या चेअरमन साहेबांशी ज्यांची खास ओळख आहे आणि केबिनमध्ये ज्यांची बऱ्याचदा ये-जा असते, अशा लोकांची नावे सांगाल का? "

" अं.. थांबा साहेब. जरा विचार करतो.. हां, पहिले म्हणजे आपले संचालक सावंतसाहेब, व्यवस्थापक श्री गणपते, शिवाय चेअरमनसाहेबांचे मित्र आणि संग्रहालयाचे देणगीदार श्री फुले, जे विलिंग्डन कॉलेजचे प्राध्यापक आहेत, आणखी, श्री शिंगारे, जे सांगलीतील नामवंत डॉक्टर आहेत, तेही इथले देणगीदार आहेत. श्री उपाध्ये आणि श्री मोरे, हेदेखील देणगीदार आहेत. उपाध्ये स्टेट बँकेचे मॅनेजर आहेत आणि मोरे राजकीय पक्षनेते आहेत. यांतील कोणी तसे वारंवार येत नाही, पण इतरांच्या तुलनेत या लोकांनी चेअरमन साहेबांची केबिन सर्वात जास्त पाहिली आहे. "

" मला या सर्वांचा कॉन्टॅक्ट आणि पत्ता हवा आहे. " अल्फा म्हणाला.

" देतो ना साहेब. या. "

केबिनमधील रजिस्टरमधून अल्फाने सर्वांची माहिती लिहून घेतली. मग आम्ही चौघे श्री सावंत जेथे बसले होते, तेथे आलो.

" काही विशेष मिळाले का? " सावंतांनी विचारले. वाघमारेंनी नकारार्थी मान डोलावली.

" सद्यस्थितीत तरी गुन्हेगार कोण आहे, हे निश्चितपणे सांगणे शक्य नाही. कारण त्याने खुपच कमी पुरावे सोडले आहेत. चेअरमनांच्या केबिनमध्ये आम्हाला गुन्हेगाराची थोडी विसंगत वागणूक आढळलीय खरी, म्हणजे तो टेबलाच्या बाजूला एकाच

ठिकाणी बसला असावा किंवा उभा असावा, बऱ्याच वेळासाठी. पण त्यावरून काही तर्कसंगती लागत नाहीये. केस अवघड आहे. "

" मग आता तुम्ही काय करणार आहात श्री सावंत? काही तासांतच सूर्योदय होईल आणि रत्नजडित खंजिर चोरीला गेल्याचे जगजाहीर होईल. " अल्फा म्हणाला. सावंतांनी नैराश्याने डोक्याला हात लावला.

" एक मिनीट सावंत.. " अल्फा म्हणाला, " तुमच्याकडे त्या खंजिराची एखादी प्रतिकृती वगैरे आहे काय? म्हणजे, जवळपास त्याच्यासारखीच दिसणारी?? "

सावंतांनी मिनिटभर विचार केला आणि एकदम ते खाडकन् उभे राहिले.

" आहे!! माझ्याकडे आहे!! " ते उत्साहित होऊन म्हणाले, " पेशव्यांच्या काळात, म्हणजे जेव्हा हा खंजिर वापरात होता तेव्हा, एका कारागिराने हलक्या धातूचा वापर करून या खंजिराची एक हुबेहुब प्रतिकृती बनविली होती आणि ती महाराजांना भेट दिली होती. रत्नांसाठी त्याने काचेचा वापर केला होता. राजेसुद्धा क्षणभर संदिग्ध झाले, की आपल्याकडचाच खंजिर हा आपल्यालाच भेट देतोय की काय. राजांनी खुश होऊन त्याला खुप मोठा इनाम दिला होता, असे म्हणतात. सुदैवाने तो खंजिर मी माझ्याच घरी व्यवस्थित जपून ठेवला आहे. "

" ही तर खुपच चांगली गोष्ट आहे श्री सावंत. " वाघमारे म्हणाले, " तुम्ही तो खंजिर घेऊन या घरातून. आत्ताच्या आत्ता. "

पण क्षणातच सावंतांचा सगळा उत्साह मावळला.

" काय झालं? " वाघमारेंनी विचारले.

" हा नकली खंजिर फार दिवस काम चालवू शकणार नाही, वाघमारेसाहेब. " सावंत म्हणाले, " महिन्यातून एकदा या संग्रहालयातील सर्व वस्तूंची तपासणी असते. सगळ्या वस्तू व्यवस्थित, स्वच्छ आहेत का, दुरुस्तीची कुठे गरज आहे का, याची तपासणी

केली जाते; आणि या महिन्याची तपासणी येत्या रविवारी आहे, आजपासून बरोबर चार दिवसांनी!! "

" अरे देवा! " वाघमारे निराश होऊन म्हणाले. सगळेचजण पुन्हा चिंतेत पडले. अल्फाने थोडा विचार केला आणि तो म्हणाला,

" आम्हाला चालेल. "

" चालेल?? " सावंतांनी विस्मयाने विचारले.

" रविवारपर्यंत गुन्हेगार शोधण्याची जबाबदारी मी उचलतो. तुम्ही तोपर्यंत तो प्रतिकृती असलेला खंजिर इथे आणून ठेवा. " अल्फा म्हणाला.

" तू काय बोलतोयस याची कल्पना आहे ना तुला? चार दिवसांत गुन्हेगार शोधणे, तेही पोलिसांच्या मदतीशिवाय.." वाघमारेंनी साशंकतेने पाहत विचारले.

"होय. मला पूर्ण कल्पना आहे. रविवारपर्यंत खरा रत्नजडित खंजिर त्याच्या नेहमीच्या जागी स्थापित झालेला असेल. " अल्फा म्हणाला.

" ठिक आहे तर, श्री सावंत. आम्ही हे मिशन पूर्ण करण्याची जबाबदारी उचलतो. रविवारपर्यंत आम्ही तुम्हाला तुमचा रत्नजडित खंजिर पुन्हा मिळवून देण्याचे वचन देतो. "

" धन्यवाद, धन्यवाद वाघमारे साहेब.. " सावंत म्हणाले, " पण तुम्ही हे करणार कसे?"

"छोट्या छोट्या गोष्टींपासून सुरुवात करायला हवी. कारण बारीक सारीक गोष्टीच खूप काही सांगून जातात. " अल्फा म्हणाला, " असो. ती आमची जबाबदारी समजा. तुम्ही फक्त तो नकली खंजिर पटकन आणा. तोपर्यंत आम्ही या मृतदेहाचे काय करायचे ते पहातो."

" होय हो.. तुम्ही निघा लगेच. आणि सावंत.. " थोडे थांबून वाघमारे म्हणाले, " तुम्ही फार काळजी करू नका. सर्व काही ठीक होईल. "

सावंतांच्या डोळयांत थोडे का होईना, पण समाधान तरळले. ते लगेचच म्युझियमच्या बाहेर पडले.

" हे बघ अल्फा.. " सावंत गेल्यानंतर वाघमारे म्हणाले, " तुला असं नाही वाटत का, की तू भलताच आत्मविश्वास दाखवला आहेस? हे खुपच अवघड काम आहे आणि ते झालं नाही, तर माझंच नाक कापलं जाणार आहे. आपल्याला रत्नजडित खंजिरासाठी पुढचे चार दिवस जंग जंग पछाडले पाहिजे. या खंजिरासारखा मौल्यवान ऐतिहासिक वारसा गहाळ होणे, ही काही साधीसुधी गोष्ट नाहीये. या सगळया नाट्यात आपली भूमिका खूप महत्वाची आहे, हे लक्षात ठेव आणि त्याप्रमाणे कृती कर. मला एरवी तुला बरोबर घेऊन काम करणे मुळीच आवडले नसते, पण आता परिस्थितीच अशी आहे, की आपल्याला एकत्र काम केल्याशिवाय गत्यंतर नाही. तू तुझ्या पद्धतीने शोध घे. मी माझ्या पद्धतीने घेतो. काही सुगावा लागला, तर आपण एकमेकांना सांगत जाऊया. "

" नक्की सर. मी परिस्थितीचे गांभीर्य लक्षात घेऊन त्याप्रमाणेच कृती करेन. "अल्फाने आश्वासन दिले.

" आता फक्त एकच काम बाकी आहे या म्युझियममध्ये. " वाघमारे म्हणाले, " चोरी झाकण्यासाठी आपल्याला आता या रखवालदाराच्या मृत्यूचा खोटा देखावा उभा करावा लागणार आहे... "

***

# 4.

दुसऱ्या दिवशीच्या सांगली वार्ताच्या पहिल्या पानावर ठळक बातमी छापून आली होती :

*'सांगलीच्या संग्रहालयात चोरीचा प्रयत्न '*

*रखवालदाराच्या प्रसंगावधानामुळे मौल्यवान ऐवज बचावला..!!*

*सांगली, ता. 9: येथील राजवाड्यामागील मध्यवर्ती संग्रहालयात काल रात्री झालेल्या नाट्यामुळे सर्वांचीच झोप उडाली होती ; पण संग्रहालयाच्या रखवालदाराने दाखविलेल्या हुशारी आणि धैर्यामुळे संग्रहालयाचा अतिशय मौल्यवान ऐवज बचावला. चोरी करणाऱ्या व्यक्तीचा संग्रहालयातील दोनशे वर्षे जुना आणि सर्वात किंमती ऐतिहासिक वस्तू असलेला रत्नजडित खंजिर चोरण्याचा हेतू होता, असे सूत्रांकडून समजते. पण हा हेतू सफल झाला नाही.*

*संग्रहालयातील पहारेकऱ्याने सांगितलेल्या माहितीनुसार, रात्री दहा वाजण्याच्या सुमारास दोघे पहारेकरी संग्रहालयावर पहारा देत होते. अचानक संग्रहालयालयाच्या आतमध्ये कोणीतरी उडी मारल्याचा आवाज आला. दोघांपैकी एकजण आतमध्ये पहाणी करण्यासाठी गेला. मिनीटभरातच बाहेर उभारलेल्या पहारेकऱ्याला एक अस्फुट अशी किंकाळी ऐकू आली. तो धावतच आत गेला. आतमध्ये पहिला पहारेकरी*

*रक्ताच्या थारोळ्यात पडलेला होता. आणखी दोन बुरखा घातलेल्या व्यक्ती तेथे होत्या, ज्या खंजीराभोवतीची फायबरची पेटी फोडण्याचा प्रयत्न करीत होत्या. पहारेकऱ्याने तत्काळ त्यांच्यावर बंदूक रोखली आणि पोलीसांना फोन लावला. त्यामुळे घाबरून त्या व्यक्ती मागच्या गेटवरून उडी मारून पळून गेल्या. जरी त्या कोण होत्या हे समजू शकले नसले, तरीही त्यांचा बेत मात्र फसला. रत्नजडित खंजिर आहे त्या जागी सुरक्षित आहे. महापौरांनी संग्रहालयावरचा पहारा वाढविण्याचे आदेश दिले आहेत. गुन्हेगारांचा शोध घेण्याचे काम सुरू आहे.*

"मिडियावालेही बिनडोक आणि त्यांच्याबरोबर ही बातमी वाचणारे लोकही बिनडोक! " मी ती बातमी वाचून संपवितो न संपवितो तोच अल्फा मोठ्ठ्याने हसून म्हणाला. आम्ही रात्री उशिरा रूमवर आलो होतो आणि त्यामुळे सकाळचे उठणेही उशीराच झाले होते. सकाळी दहाच्या सुमारास आमचे पेपर वाचन सुरू होते, " त्या मागील गेटपाशी असलेल्या पाऊलखुणा माझ्या आणि वाघमारे सरांच्या पावलांशी जुळवून पाहिल्या, तर त्यांत जराही फरक आढळणार नाही. पण थँक गॉड! सर्वांना आम्ही केलेला चोरीच्या प्रयत्नाचा देखावा पटला!"

"हे असंभव आहे अल्फा! " मी पेपर बाजूला फेकत म्हणालो, " तू मूर्खासारखी स्वतःच्याच पायावर कुऱ्हाड मारून घेतली आहेस. रविवारपर्यंत खंजिर शोधून संग्रहालयात परत ठेवणे.. आज कोणवार आहे याची कल्पना आहे का तुला? बुधवार!! आणि आपल्या हातात तरी काहीच नाहीये. आता चार दिवसांत तू गुन्हेगाराला जगाच्या कुठल्या टोकाला जाऊन शोधणार आहेस? आणि कोणत्या आधारावर?? "

" जगाचे टोक कसे रे? पृथ्वी तर गोल आहे आणि गोलाला कधी टोक असते का? टोक शोधण्यासाठी एका ठिकाणाहून निघशील तर फिरून परत त्याच ठिकाणी परत येशील.. पण टोक मात्र सापडणार नाही. आता फर्डिनांड मॅगेलनच घे ना. पृथ्वीचे टोक शोधायला निघाला आणि गोल वळसा मारून पुन्हा आपल्याच देशात जाऊन पोहोचला! तेव्हा खऱ्या अर्थाने सिद्ध झाले, की पृथ्वी गोल आहे!! आणि तुला ठाऊक आहे का, हा मॅगेलन

त्याची समुद्रसफर संपायच्या आतच मेला होता. मग त्याच्या सहकाऱ्यांनी पृथ्वीची प्रदक्षिणा पूर्ण केली. पण नाव मात्र झाले मॅगेलनचे! बिचारे त्याचे सहकारी! त्यांना कोणी कुत्र्यानेही विचारले नसेल.. "

वायफळ बडबड आणि विषयावरून भरकटणे ही अल्फाची नेहमीची सवय. आता फर्डिनांड मॅगेलनचे सहकारी आणि संग्रहालयात झालेली चोरी यांचा कुठे तिळमात्र तरी संबंध होता का?

" आणि माय डिअर प्रभव, चार नाही, पाच दिवस आहेत. आपल्याकडे. रविवारच्या दिवशी तपासणीसाठी त्या खंजिराची पेटी उघडेपर्यंत वेळ आहे आपल्याकडे. स्वतःला कधीच कुठे कमी समजू नकोस मित्रा. तसे केल्यामुळे आपल्या आतील निद्रिस्त शक्ती निद्रिस्तच राहते. आव्हाने स्वीकारायची असतात. त्याशिवाय ही शक्ती जागृत होत नाही. "

" पण तू सुरूवात कोठून करणार? " मी विचारले.

" सोप्पं आहे! खंजिर मिळविण्यासाठी त्या पेटीच्या किल्ल्या कोठे ठेवलेल्या असतात, हे माहित असणं आवश्यक होतं. तसं असणारे फक्त काहीच लोक आहेत, ज्यांची नावे व पत्ते मी काल लिहून आणले आहेत. कपाटातल्या चोरकप्प्यातील किल्ल्या फक्त अशी व्यक्ती घेऊ शकते, जिची चेअरमनच्या केबिनमध्ये सारखी ये जा असेल आणि जिला केबिनची सखोल माहिती असेल. त्यांची प्रथम मी माहिती काढणार आहे आणि कोण गुन्हा करण्यास अनुकूल आहे, हे ताडून पाहणार आहे. " अल्फा म्हणाला.

" हं. लॉजिक तरी बरोबर आहे. " मी म्हणालो.

" पण तरीही, मला या केसची चिंता चांगलीच सतावतेय." अल्फा म्हणाला, "हे लॉजिक वापरून ही केस सुटेल, याबाबत मी साशंक आहे. मला तर वाटतेय, की ही केस दिसतेय तेवढी साधीसुधी मुळीच नाहीये. काहीतरी प्रचंड घोटाळा आहे यामध्ये."

"कसला घोटाळा?? "

" चेअरमनची केबिन!! " अल्फा म्हणाला, " तिथे काय घडलेलं असावं, हेच समजत नाहीये. पहिली संशयास्पद गोष्ट म्हणजे तो चाव्यांचा जुडगा. त्यामध्ये किमान दहा तरी चाव्या होत्या. त्यामधून खुनीला बरोबर खंजिराच्या पेटीची चावी सापडावी? आणि तीही पटकन? ती व्यक्ती काय इतक्या सरावाची होती? मला तर तो चोरकप्पा शोधणेही बरेच अवघड गेले असते. इथे तर या महाशयांनी कप्पा शोधला, जुडग्यातून चावी शोधली, खंजिर घेतला, पहारेकऱ्याचा खुन केला.. तेही अत्यल्प वेळात! निश्चितच पटण्यासारखे नाही. त्यामुळे खुनी हा केबिनमध्ये वावर असलेला आणि केबिनची चांगली खडानखडा माहिती असलेलाच कोणीतरी असणार, असा माझा कयास आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे चेअरमनचे टेबल आणि त्याच्या पायलगतचा गालिचा. जर खुनीला चावीच हवी होती, तर ती घेऊन त्याने पटकन आपले काम उरकायला हवे होते. मग हा पठ्ठ्याने टेबलापाशी जाऊन बसकण कशाला मारली? तेही इतका वेळ, की त्याच्या वजनाने गालिचा दबला जावा.. या दोन्ही गोष्टी पूर्णपणे विसंगत आहेत एकमेकांशी. आणखी एक गोष्ट, जी मी तेथे पाहिली - हे बघ. "

अल्फाने आपला मोबाईल मला दाखविला.

" हे काय आहे? " मी विचारले.

" मोबाईल आहे! काय रे प्रभव! तुला नाही त्या वेळी थट्टा कशी सुचते? " अल्फा म्हणाला.

" अहो विद्वान, मी मोबाईलमधल्या फोटोबद्दल विचारतोय! "

" अच्छा. असे स्पष्ट नमूद कर ना मग! " अल्फा म्हणाला, " त्या टेबलावरचा काळा डाग. हा त्या दबलेल्या गालिचाच्या वरच्याच बाजूला होता. मी त्याचा वास घेऊन पाहिला. आपण गाड्यांना वगैरे ऑइलींग करण्यासाठी वापरतो ना, त्या ऑईलचे डाग होते ते. वंगणाचे. "

" अच्छा, म्हणजे तू त्याचा वास पहात होतास काल? मी पाहिले होते तुला तेव्हा. " मी.

" हो. तेव्हाच मला तो डाग दिसला. तसेच डाग मृत पहारेकऱ्याच्या कपड्यांवर आहेत आणि संग्रहालयाच्या मागील बाजूस असणाऱ्या या खिडकीवरपण आहेत- जिथून खुनी आत आला. पण गोंधळात टाकणारी गोष्ट आहे ना ही? वंगणाचे डाग इथे कोठून आले? खुनीने संग्रहालयाकडे निघताना नक्कीच गाडीचे काहीतरी काम केले होतं. त्याशिवाय त्याच्या अंगाला वंगणाचे डाग लागणार नाहीत. शिवाय टेबलामागे बसून तो काय शोधत होता, त्याला काय हवे होते, हाही कळीचा मुद्दा आहे. थोडक्यात काय, तर आपल्याला एक असा माणूस शोधायचाय, जो चेअरमनसाहेबांचा निकटवर्तीय आहे, ज्याची केबिनमध्ये सतत ये जा असते, जो काल रात्री दहाच्या सुमारास घरी नव्हता आणि ज्याच्या गाडीची ऐनवेळी काहीतरी तक्रार निर्माण झाली होती.. "

" आणि तेही रविवारच्या आत!! " मी पुन्हा सुरूवातीचाच सूर ओढला.

" शोधू रे.. आपल्याला तो नक्की सापडेल. " अल्फाने पेपरमधल्या बातमीवरून पुन्हा एकदा नजर फिरवली, " इथेच! इथेच आहे ते कारण! आपण रात्री तयार केलेल्या देखाव्याचा कोणाला तिळमात्रही संशय आला नाही! माझ्यासारखा एखादा चाणाक्ष आणि बुद्धिमान माणूस (मी जरा खाकरलोच!) जर पोलीस खात्यात असता, तर त्याने दोनच मिनीटांत ओळखले असते, की हे सगळे चित्र बनावट आहे म्हणून. गुन्ह्याच्या जागेची वरवर पहाणी करायची आणि रिपोर्ट लिहून घ्यायचा एवढेच काम आजकालचे पोलीस करतात. तरी बरं, ती पेटी फुटली नाही. मी त्यावर दोन घाव घातलेच होते.. "

मी हसलो.

" पण अल्फा, वाघमारे तुझ्यावर इतके खार खाऊन का होते रे? तुला पाहून काल त्यांना मुळीच आनंद झाला नव्हता. "

" अरे त्याचं काय आहे, ते सांगलीचे पोलीस अधीक्षक आहेत ना. त्यांच्या कामात मी फारच लुडबुड करतो असं त्यांचं म्हणणं आहे. पण ती लुडबुड नसून मदत असते, हे वाघमारे सोडून कोणीही कबूल करेल. बऱ्याच प्रकरणांचा छडा मी लावलेला आहे. त्यामुळे आपल्या निम्मे वय असलेला हा पोरगा आपल्यापेक्षा वेगाने कशी काय प्रकरणे सोडवितो, या विचाराने त्यांचा तिळपापड होत असेल. त्या सोडविलेल्या प्रकरणांचे श्रेय मी कधीच घेत नाही हेही खरंच. पण वाघमारेंना मात्र मी मुळीच आवडत नाही. काल रात्रीच्या प्रसंगी मी तेथे असणे त्यांना नक्कीच अनपेक्षित असेल. पण काय करणार! एखादे कोडे मला खुणावत असेल, तर मीही स्वतःला थांबवू शकत नाही ना. "

" हं. असं आहे तर. " मी म्हणालो.

" चला. भरपूर बडबड आणि विचारमंथन झालेलं आहे. आता कामाला लागायला हवं. " अल्फा खुर्चीवरून उठला, " बाय द वे प्रभव, तुझ्या लिहीण्याचा स्पीड बराच चांगला आहे, असं आत्तापर्यंत मला दिसून आलंय. "

" हो का?" अचानकच अल्फा माझ्या लिहीण्याच्या स्पीडवर कसा आला, हेच मला समजेना.

"आणि आज मला खुपच पळापळ करावी लागणार आहे. तू पाहतोयसच ना! त्या सगळ्या लोकांची माहिती काढणे, पुरावे गोळा करणे आणि बरंच काही.. "

" बरं मग?? " अजुनही मला अल्फाला काय सांगायचे होते, हे कळाले नव्हते.

" आणि नेमकं आज आमच्या महान सरांनी भलामोठ्ठा होमवर्क देऊन ठेवलाय! अर्थात, मी त्यांना आठवडाभर टोलावलं होतं. पण आज मात्र तो मला लिहायलाच हवाय. नाहीतर ते माझी बँड वाजवतील."

आता मात्र माझ्या सर्व ध्यानात आले.

" नाऽऽही!! " मी जोरात म्हणालो, " मी काही तुझा होमवर्क बिमवर्क अज्जिबात करणार नाहीये हां!! "

" अरे यार प्लीज ना! मला आता रविवारपर्यंत हलता येणार नाही. रत्नजडित खंजिराचे कोडे मला सोडविलेच पाहिजे. आणि होमवर्क म्हणजे काहीएक डोके लावायचे काम नाहीये रे. फक्त एका वहीतून दुसऱ्या वहीत उतरवून काढायचे आहे. तेवढे कर ना." अल्फा विनवणी करीत म्हणाला. पण त्याचा माझ्यावर काही परिणाम झाला नाही.

"मुळीच नाही! " मी ओरडलो. (अभ्यासाच्या बाबतीत मी कुठेही तडजोड करायला कधीच तयार व्हायचो नाही!) " तुझ्याकडे आठवडाभर होताच ना! मग तेव्हा करायचा होतास! अभ्यास हा आपल्यासाठीच असतो अल्फा. तो आपणच करायला हवा. तुझा हा आडमार्ग आणि अभ्यास या दोन्हीही गोष्टी तुला मॅनेज करता आल्याच पाहिजेत."

"बास! " अल्फाने हात टेकले, " हे ऐकण्यापेक्षा माझे चारएक मार्क्स गेलेले बरे!! तू फारच बोअर माणूस आहेस बाबा! असो. तो होमवर्क जाऊदे पाण्यात. आता झटपट हालचाली करण्याची वेळ आलेली आहे, खंजिरासाठी. मी निघतो आता. "

" बरं बरं. " मी तुटकपणे म्हणालो, " कधी येणार? "

" सांगता येत नाही. सायंकाळपर्यंत काही हातात येईल, अशी अपेक्षा आहे.. " असे म्हणत अल्फा रुमबाहेर पडला.

*

संध्याकाळ झाली. साडेपाच वाजता मी आमच्या रुममध्ये परतलो, तेव्हा तिला कुलूपच होते. याचाच अर्थ, अल्फा अजुनही मोहिमेवरच होता. मी तोंड वगैरे धुवून फ्रेश झालो. अल्फाची कामात किती प्रगती झाली असेल, याचाच विचार मी करीत होतो. पण काही अंदाज येईना. मग मी थोडा वेळ फेसबुक उघडले. पण तेही बोअर वाटू लागले. वारंवार माझ्या डोळ्यांसमोर कालचेच दृश्य येत होते. रक्ताच्या थारोळ्यात

पडलेला पहारेकरी.. माझ्या अंगावर पुन्हा शहारे आले. कोणाचा हात असेल यामागे? अल्फाची बुद्धी या क्षणी त्याच गोष्टीचा पाठलाग करीत होती.

अखेर सात वाजले आणि अल्फा रूमवर परतला- हात हलवित आणि चेहऱ्यावर या चिंतेचे सावट घेऊन. त्याने आपला मळकटलेला पेहराव बदलला आणि खुर्चीवर त्याने स्वतःला झोकून दिले.

"काही मिळाले?? "मी उत्सुकतेने विचारले.

" शून्य!! " खुर्चीच्या पाठीवर डोके ठेवून अल्फाने आपले पाय लांब केले आणि डोळे मिटून घेतले, " वाळलेलं गवतसुद्धा हाती आलं नाही. "

मला हेच उत्तर अपेक्षित होते. कारण अल्फाचा पडलेला चेहराच बोलत होता.

" मग इतका वेळ होतास तरी कुठे? "

" फिरतच होतो की.. इकडून तिकडे.. काल बनविलेल्या लिस्टमधील सर्वांची माहिती काढण्यासाठी. " अल्फा उत्तरला, " एकही जण आपल्या तर्कसंगतीत बसत नाही. गुन्हा घडला, त्यावेळी सर्वजण घरीच होते. मी सर्वांच्या शेजाऱ्या - पाजाऱ्यांकडून, किंवा घराच्या रखवालदारांकडून ही माहिती मिळविली. फक्त डॉक्टर शिंगारेंचा याला अपवाद आहे. पण तेही रात्री दवाखान्यात होते, एक महत्त्वाचे ऑपरेशन करीत होते. मी नर्सेसना विचारून खात्री करून घेतली आहे. थोडक्यात, पुराव्यानिशी असं सिद्ध होतंय, की चेअरमनचे निकटवर्तीय असणारे कोणीही काल रात्री म्युझियमकडे फिरकलेसुद्धा नाही. "

" मग स्वतः श्री सावंत? किंवा तो पहारेकरी माळी? त्यानेच असा बनाव रचला नसेल ना? " मी विचारले.

" नाही. "अल्फा म्हणाला, " मी त्यांचीही चौकशी केली. सावंतदेखील गुन्हा घडला, त्या वेळी घरीच होते आणि माळीचा घटना घडल्यानंतर जेव्हा फोन आला, तेव्हाच ते घटनास्थळी आले. आणि माळीबद्दल विचारशील, तर त्यालाही मी खुपच खोदून खोदून

विचारले. पण त्याच्या बोलण्यात कुठे फरक आढळला नाही. याचाच अर्थ तो खरे बोलत असला पाहिजे. आणि शिवाय मी त्याचे रेकॉर्ड्स चेक केले. वीस वर्षे तो इथे काम करतोय आणि तो अतिशय प्रामाणिक आहे, असे मला आढळून आले. "

" पण हे कसे शक्य आहे? चेअरमनची केबिन चांगल्या प्रकारे माहीत असणारे एवढेच जण आहेत ना? मग यांच्यातील एक तरी जण गुन्हेगार असायलाच हवा. " मी म्हणालो.

" तोच तर यक्षप्रश्न आहे! " अल्फा त्रासिकपणे म्हणाला, " यावरून केवळ इतकाच अर्थ निघतो, की आपला तपास चुकीच्या दिशेने चालू आहे. प्रत्येक गुन्ह्य़ाची पाळेमुळे खोदून काढताना एक गोष्ट फार महत्त्वाची असते- ती म्हणजे 'गृहीतक'!! आपण काहीतरी गृहीत धरून चालल्याशिवाय गुन्हेगाराला शोधू शकत नाही. हे गृहीतक आपण केलेल्या निरीक्षणांवरती आणि आपल्या कल्पनाशक्तीवरती अवलंबून असते. या दोहोंचा एकदा का बरोबर मेळ बसला, की गुन्हेगारापर्यंत पोहोचण्यास वेळ लागत नाही आपल्या बाबतीत हेच गृहीतक कुठेतरी चुकतंय. मग त्याला कारणीभूत असणारी चूक आपल्या निरीक्षणात आहे, की आपल्या कल्पनेत आहे, कोणास ठाऊक? पण काहीतरी चुकतंय, हे नक्की! माझे निरीक्षण चुकीचे असू शकत नाही हेही नक्की. मग आपण विचार करण्यात कुठेतरी चुकतोय, असाच याचा अर्थ होतो. "

" पण नक्की कुठे? " मी विचारले.

" त्याचाच शोध मी आज रात्री बसल्या बसल्या घेणार आहे. " अल्फा म्हणाला, " आजचा संपूर्ण दिवस वाया गेला, याचंच दुःख आहे. "

" आज दिवसभर तू फक्त माहिती काढणे इतकेच करीत होतास, की आणखी काही? "

" तेवढेच नाही काही फक्त.. म्युझियमकडे गेलो होतो ना. मला थोडा संग्रहालयाच्या आवाराचा शोध घ्यायचा होता. गुन्हेगार गाडीने आला असणार, हे तर नक्की. मग त्याच्या बंद पडणाऱ्या गाडीचे निशाण कुठे मिळतायत का, ते पाहिले. पण सकाळ होईपर्यंत तेथे इतक्या गाड्या येऊन गेल्या होत्या, की मला त्यांमधून काहीही हाती लागले नाही. असो. आता तपासाची नवी दिशा शोधायला हवी. आता आवरून थोड्या वेळात आपण जेवायला बाहेर पडूया. थोडा वेळ हा विषय माझ्या डोक्यातून बाहेर पडू दे. "

असे म्हणून अल्फाने कानाला हेडफोन लावले आणि डोळे मिटून तो शांतपणे पडून राहिला.

" अरे अल्फा, तुला एक गोष्ट सांगायचीच राहिली. " मी एकदम आठवून म्हणालो. अल्फाने हेडफोन काढून माझ्याकडे पाहिले.

" मी तुझा होमवर्क पूर्ण केला आहे!"

अल्फाने स्मित केले आणि पुन्हा तो संगीत ऐकण्यात हरवून गेला.

***

# 5.

दुसऱ्या दिवशीही अल्फा मोहिमेवर गेला. पण मी उठलो तेव्हा अल्फा आवरण्याच्या गडबडीत होता. त्यामुळे त्याच्या आजच्या कामगिरीबद्दल त्याने काही विशेष सांगितले नाही. फक्त 'समडोळीला जाऊन येतो' एवढेच बोलून तो बाहेर पडला. समडोळी हे सांगलीपासून दहा - बारा किलोमीटर अंतरावर असलेले एक खेडेगाव. आता तिथे या पठ्ठ्याचे काय काम निघाले कोणास ठाऊक? त्या दिवशी मात्र अल्फाला परतायला खुपच उशीर झाला. तो आला तेव्हा रात्रीचे दहा वाजायला आले होते. कालच्यासारखेच आल्या आल्या त्याने स्वतःला खुर्चीत झोकून दिले.

"अरे कुठे आहेस माणसा? दिवसभर मी वाट पाहतोय तुझी. सांगूनसुद्धा गेला नाहीस धड.. " मी म्हणालो.

" समडोळीला गेलो होतो. आज थोडं समाधानकारक काम झाल्यासारखं वाटतंय. " अल्फा घाम पुसत म्हणाला.

" ही समडोळीची वारी मधुनच कुठून उपटली?? "

" पाटीलचे गाव.. "अल्फा म्हणाला, " महादबा पाटील. वय वर्षे चव्वेचाळीस. मुलगा इंजिनिअरिंग शिकतोय आणि मुलगी नववी. वडील गावातले मोठे जमीनदार होते. ते दोन महिन्यांपूर्वीच वारले. त्याला एक सावत्र भाऊ आहे. पण त्या दोघांमध्ये कधी कुरबुर नसायची, असे गावातले लोक म्हणतात. पण मी जरा आणखी खोल जाऊन चौकशी केली. त्यांचे घरचे धुणे धुणाऱ्या माणसाला गाठले. त्याने मला सांगितले, की वडील वारल्यापासून या दोघा सावत्र भावांमध्ये थोडे गरम वातावरण निर्माण झाले होते- जमिनीच्या

वाटणीवरून. महादबा या दोघांत मोठा होता. त्यामुळे त्याचे मत असे, की जमीन माझ्या हाताखाली यायला हवी. महादबा हा पहिल्या बायकोचा मुलगा होता. त्याचा सावत्र भाऊ अनिल हा धाकटा. महादबा जमिनीची वाटपच करायला तयार नव्हता. पण अनिलला जमीन हवी होती. हे प्रकरण त्यांनी घराच्या बाहेर जाऊ दिले नव्हते. त्यामुळे मला माहिती काढायला थोडे कष्ट पडले. महादबाची ही एक गोष्ट सोडली, तर बाकी कोणा गावकऱ्याशी कशा बाबतीत दुष्मनी नव्हती. या सर्वावरून तू काय निष्कर्ष काढशील? "

" साहजिकच संशयाचा रोख महादबाचा सावत्र भाऊ अनिल याच्याकडेच जातो. " मी विचार करत म्हणालो.

" आणि या सर्वांवरती कडी म्हणून, मी अनिल पाटलाबद्दल जेव्हा माहिती काढली, तेव्हा मला समजले, की तो धंद्याने मेस्त्री आहे! मेकॅनिक..!! " अल्फाने सांगितले.

मला धक्काच बसला.

" याचा अर्थ.. चेअरमनच्या केबिनमधील टेबलाला लागलेले ते अॉईलचे डाग... "

" त्याच्याच हाताचे असणार!! " अल्फा म्हणाला.

" मग तर हे सरळच आहे, की खुन आणि चोरी अनिल पाटलाने केले आहे. मग आता केसमध्ये शिल्लक तरी काय राहिलं? गुन्हेगार तर सापडला..! " मी उत्साहित होऊन म्हणालो.

" थांब थांब, अशी घाई करू नकोस मित्रा! " अल्फा म्हणाला, " हे सगळं इतकं सरळ असतं, तर मी आत्ता त्या अनिल पाटलाला पोलीस कोठडीत पोहोचवून नसतो का आलो? पण अजून मी तसे काही केलेले नाहीये. "

" का?? " मी बुचकळ्यातच पडलो.

" मी अनिल पाटलाचा फोटो मिळवला आणि आत्ता येताना संग्रहालयाच्या पहारेकऱ्याला - तुकाराम माळीला भेटून आलो. त्याला विचारले, की या माणसाला तू कधी पाहिले आहेस का. तर त्याने नकारार्थी उत्तर दिले. याशिवाय संग्रहालयाच्या इतर पहारेकऱ्यांना, शिवाय कामगारांनाही विचारले. पण कोणीच फोटोतल्या माणसाला ओळखत असल्याचे सांगितले नाही. याचा अर्थ अनिल पाटील संग्रहालयात कधी गेलाच नाही आणि गेला असेलच, तर केवळ एक - दोनदाच गेला असणार. मग चेअरमनच्या केबिनमधल्या कपाटातील चोरकप्प्यातील चाव्यांच्या जुडग्यातील बरोबर खंजिराच्या पेटीची चावी त्याला ठाऊक असण्याची सुमार शक्यतासुद्धा मला वाटत नाही, किंवा इतर कोणाकडून त्याने माहिती मिळविली, असेही सिद्ध होत नाही. दुसरी गोष्ट, जर त्याचे वैर त्याच्या सावत्र भावाशीच होते, तर त्याला ठार मारणे हे एकच त्याचे उद्दिष्ट असायला हवे. उगाच खंजिर चोरून नसत्या भानगडीत पडण्याची त्याला गरजच काय? आणि तिसरी गोष्ट, रत्नजडित खंजिरासारखी मौल्यवान वस्तू चोरी केल्यानंतर कोणी ती आपल्या घरी लपवून ठेवत नाही. तो कोण्या चोरबाजारातील हेराफेरी करणाऱ्या पैसेवाल्याला विकणार. त्याबद्दल माहिती मिळविण्यास मी वाघमारे सरांना सांगितले होते. त्यांचाही काही फोन नाही. या सर्व गोष्टी हेच दर्शवितात, की अनिलने गुन्हा केलेला नाहीये. आता बोल!! "

मी जरा डोके खाजविले, पण काहीच तर्कसंगती लागेना.

" पण हे अशक्य आहे.. " मी म्हणालो, " एकीकडे सिद्ध होतेय, की अनिल पाटील खुन झाल्याच्या रात्री संग्रहालयात गेला होता आणि त्यानेच खुन केला आहे, आणि दुसरीकडे तू दिलेल्या स्पष्टीकरणामुळे हीच गोष्ट फोल ठरते. हा नक्की काय विरोधाभास आहे?? "

" हेच कोडं आपल्याला सोडवायचं आहे. " अल्फा म्हणाला, " आत्ता मला दोन फोन येणे अपेक्षित आहे. पाहूया, त्यांमधून काही मदत होते का.. तोपर्यंत तू तुझा अभ्यास सुरू ठेव. "

" आणि तुझ्या जेवणाचं काय? मेस बंद होऊन आता कितीतरी वेळ झाला.. " मी म्हणालो.

" काळजी करू नकोस. मी येताना थोडं खाऊनच आलोय. तुला काय वाटलं, न खाता पिता मी उपाशीपोटी इतका शोध घेऊ शकेन? खरं तर जितकी उर्जा माझ्या या धावपळीवर खर्च झाली असेल, त्याच्या कैक पटींनी जास्त उर्जा माझ्या मेंदूने या केसचा विचार करण्यात आणि एक एक धागा जोडण्यात खाल्लेली आहे! असो. थोडा वेळ तू तुझे काम कर आणि माझ्या मनाला थोडा एकांत दे.. "

मी पुन्हा पहिल्यासारखे पुस्तक उघडून त्यात डोके घातले. साधारणतः पुढचा अर्धा तास आमच्या खोलीत नीरव शांतता होती. अल्फाने खुर्ची खिडकीजवळ ओढली होती आणि अर्धा तास तो खिडकीतून बाहेरच्या आकाशाकडे पहात विचार करण्यात गढून गेला होता. अकराच्या सुमारास अल्फाचा मोबाईल खणाणला आणि इतक्या वेळ टिकून राहिलेल्या शांततेचा भंग झाला.

"हां वाघमारे सर.. बोला. " अल्फा फोन उचलून म्हणाला. म्हणजे तो वाघमारेंचा फोन होता. पाच मिनिटे अल्फाचा फोन सुरूच राहिला. मी अल्फाच्या बोलण्यातून वाघमारे त्याला काय सांगत असावेत, हे ओळखण्याचा प्रयत्न केला, पण ते काही मला जमले नाही. महत्त्वाच्या फोन्सवर अल्फा बोलायचाच असा, की त्याच्या आजुबाजुला असणाऱ्यांना त्याच्या बोलण्यातले काडीमात्रही न कळावे. त्यामुळे शेवटी मी त्याच्याकडे दुर्लक्ष केले. त्याने फोन ठेवला आणि मघासारखाच तो खिडकीतून बाहेर पहात राहिला.

पाचच मिनीटांनी त्याचा फोन पुन्हा एकदा वाजला. यावेळी त्याने 'हां, बोल मित्रा..' अशी सुरुवात केली. मला समजेचना, की हा कुठला नवीन 'मित्र' आणि इतक्या रात्री अल्फाला त्याच्या फोनकडून काय अपेक्षित असावे. हा फोन मात्र अल्फाने मिनीटभर बोलून ठेवून दिला. त्याच्या अपेक्षेप्रमाणे त्याला दोन्ही फोन आले होते. त्यामुळे मी माझे पुस्तक बाजूला ठेवले आणि अल्फा त्या फोन्सची भानगड नक्की काय आहे ते सांगेल, या

अपेक्षेने त्याच्याकडे पाहू लागलो. अल्फा मात्र समाधानी दिसण्याऐवजी जास्तच गोंधळात पडलेला दिसत होता.

"हो, हो, सांगतो तुला, मला आत्ता जे कळलंय त्याबद्दल. " माझ्या उत्सुकतापूर्ण चेहऱ्याकडे पहात अल्फा म्हणाला, " पण एक गोष्ट मात्र नक्की आहे. या केसमध्ये काहीतरी प्रचंड मोठा घोटाळा आहे..!! "

" का रे? " मी विचारले.

" थांब. मी तुला सविस्तर सांगतो. " अल्फा खुर्ची वळवित म्हणाला, " आत्ता मला जो पहिला फोन आला, तो वाघमारे सरांचा होता. त्यांनी गुप्तपणे दोन दिवस चोरबाजार, गुंडांच्या वस्त्या, जुगाराचे अड्डे यांसारख्या ठिकाणी रत्नजडित खंजिराचा काही सुगावा लागतो का, याचा शोध घेतलाय. गुन्ह्यांची माहिती मिळविण्यासाठी यांसारखी उत्तम ठिकाणे नाहीत. थोडीशी खोलात जाऊन चौकशी केली, की अलिकडे घडलेल्या गुन्ह्यांच्या मागे कोणाचा हात असावा, किंवा चोरलेल्या मालाचा सौदा कुठे होतोय, याविषयी बरीच माहिती मिळते. अट फक्त इतकीच, की अशी चौकशी करताना तुमची खरी ओळख त्या लोकांना समजली नाही पाहिजे. नाहीतर तुमच्या जिवंत राहण्याची एक टक्का आशाही करायला नको. वाघमारे सरांनी सांगितले, की चोरबाजारात सध्या कोणत्याही प्रकारची तेजी नाहीये, किंवा नव्या किंमती वस्तूंच्या चोरीबाबत चर्चा नाहीये. कोणाला रत्नजडित खंजिर चोरीला गेलाय, हे ठाऊकच नाहीये. सर्वसामान्य लोकांप्रमाणे त्यांनाही असेच वाटतेय, की रत्नजडित खंजिराच्या चोरीचा प्रयत्न फसलाय. थोडक्यात काय, तर ज्याने खंजिर चोरलाय, त्याने अजुनही तो स्वतःकडेच ठेवलाय आणि त्याचा कुणाशीही सौदा केलेला नाहीये.

दुसऱ्या फोनबद्द्ल सांगायचे झाले, तर तो समडोळीतून आला होता. अनिल पाटलाच्या धुणेवाल्या पोराचा. त्याला आता मी चांगलेच विश्वासात घेतले आहे. त्याला मी दोन कामे सांगितली होती - एक म्हणजे अनिल पाटलाच्या घराचा आतून वरवर शोध घेणे

आणि रत्नजडित खंजिराचा कुठे वास येतोय का, ते पहाणे, आणि दुसरे म्हणजे मंगळवारी रात्री दहा वाजण्याच्या सुमारास अनिल कुठे होता, याचा शोध घेणे. त्याने सांगितल्यानुसार मंगळवारी, ज्या रात्री गुन्हा घडला, त्या रात्री अनिल घरी नव्हता. घरीच काय, तो तेव्हा गावातच कुठे नव्हता!! अनिलच्या बायकोने सांगितले, की संध्याकाळी सातच्या सुमारास 'वर्कशॉपसाठी काही मेकॅनिकल पार्ट आणतो' असे सांगून तो सांगलीला गेला होता- गाडी घेऊन. त्यानंतर तो थेट रात्री बारा वाजता परतला, आणि तेही रिकाम्या हातांनी. पार्ट्स न आणताच.. तिने त्याला 'इतका वेळ कुठे होतात' म्हणून विचारले, पण त्याने काहीच उत्तर दिले नाही. त्या रात्री तो न जेवताच झोपला म्हणे. आता यातून काय निष्कर्ष निघतो? "

" असाच, की अनिल घरी खोटे सांगून संध्याकाळी सांगलीत आला. संग्रहालयाचा परिसर सामसूम होईपर्यंत त्याने इकडेतिकडे वेळ घालवला. दहाच्या सुमारास संग्रहालयात येऊन त्याच्या भावाचा खुन केला आणि खंजिर घेऊन पुन्हा रात्री उशिरा गावाकडे परतला. " मी सफाईदारपणे म्हणालो.

"हां.. हे फक्त तू दुसऱ्या फोनवरून मिळालेल्या माहितीच्या आधारे बोललास. पण जेव्हा तू वाघमारे सरांनी दिलेल्या माहितीचासुद्धा विचार करतोस, तेव्हा तुला हेच शब्द मागे घ्यावे लागतात." अल्फा म्हणाला.

"हो, खरंय तुझं. " विचार करून शेवटी मी म्हणालो.

" या दोन फोन्समुळे हे कोडं सुटण्याऐवजी अधिकच गुंतागुंतीचं झालेय. अनिल पाटलाबाबतचा विरोधाभास जास्तच गडद झालाय. रत्नजडित खंजिर जेव्हा चोरीला गेला, तेव्हा अनिल नक्कीच त्या संग्रहालयात होता - त्या ऑईलच्या डागांवरून हे सिद्ध होतं. पण त्याच्याजवळ खंजिर असल्याचा कोणताच मागमूस लागत नाही.. विचित्र... अति विचित्र!! "

" मग याचा अर्थ आपण नक्की काय घ्यायचा? अनिलने गुन्हा केलेला आहे की नाही? " मी विचारले.

" संदिग्ध प्रश्न आहे. मी इतक्यातच या प्रश्नाचे उत्तर नाही देऊ शकणार. " चिंताग्रस्त चेहऱ्याने अल्फा म्हणाला, " आणि क्षणभरासाठी आपण असे समजूया, की या प्रश्नाचे उत्तर आपल्याला ठाऊक आहे. तरीही शेवटी एक प्रश्न उरतोच - गुन्हेगार चेअरमनच्या टेबलामागे बसून काय करीत होता?? आणि तेही बऱ्याच वेळासाठी, जेव्हा त्याचे काम फक्त कपाटातील किल्ली मिळविणे इतकेच होते??"

"तू तर प्रश्नांवर प्रश्न उभे करत चाललायस अल्फा! मी तर बुवा हार मानली. जाम कन्फ्यूजिंग आहे ही केस. " मी म्हणालो, " पण या सर्वांत काहीतरी धागा असेलच ना? या सगळया घटनांना जोडणारा? "

" नक्कीच असणार.. " अल्फा उत्तरला, " पण तोच तर सापडत नाहीये ना. प्रत्येक घटनेला एक तर्कशुद्ध कारण असते. त्या कारणाशिवाय ती घटना घडत नाही. गुन्हेगार चेअरमनच्या टेबलाच्या मागे बसून राहिला, यालासुद्धा काहीतरी ठोस कारण असायलाच हवे. कोणताही गुन्हेगार गुन्हा करताना ते काम लवकरात लवकर संपावे, या घाईत असतो. गुन्हा करताना आपण पाहिले जाऊ, अशी भीती त्याच्या मनात भरून राहिलेली असते. अशा वेळी त्याचे एका जागी बसून राहणे सुसंगत वाटत नाही. "

" मग? आता? " मी विचारले.

" आता काय! जोपर्यंत उत्तर मिळत नाही, तोपर्यंत विचार करणे हा एकच पर्याय. " अल्फाने आपली खुर्ची पुन्हा पहिल्यासारखी खिडकीच्या बाजूला ओढली. आपला मोबाईल घेतला आणि त्याला हेडफोन लावला. महाशयांचा हा एक भारी छंद होता. अल्फाच्या मोबाईलमध्ये माझ्या माहितीप्रमाणे कमीत कमी हजारभर तरी गाणी होती. त्यातली बहुतांश शास्त्रीय संगीताची होती (संगीतातील माझा अतिशय नावडता प्रकार!). बाकी मग काही ठराविक जुनी - नवी गाजलेली. काही काम नसेल किंवा काय करावे हे सुचत नसेल, तेव्हा लागलीच हेडफोन कानात घालायचा आणि शांतपणे पडून रहायचे. मला

तर तीच तीच गाणी ऐकून बोअर झाले असते. पण अल्फा मात्र संगीतासाठी कधी थकायचा नाही.

"उद्या मला कॉलेजमध्येही एक चक्कर टाकावी लागणार आहे. " हेडफोन कानाला लावण्याआधी अल्फा म्हणाला.

" तू आणि कॉलेजला? " मला हसूच आले, " का रे बाबा? एवढी काय बिकट परिस्थिती निर्माण झाली? "

" मी ओळीने गेले पाच प्रॅक्टीकल्स चुकवले आहेत. आज मला त्या मास्तराचा फोनच आला शेवटी. उद्या जर नाही आलास तर परिक्षेलाही येऊ नकोस म्हणे! आता गोष्ट गळ्याशी आलीये म्हटल्यावर जायला तर हवेच. "

" मी पहिल्यापासूनच सांगत होतो, की विनाकारण कॉलेजला दांड्या मारू नकोस म्हणून. आता बस अटेंड करत." मी म्हणालो.

"दो घंटो की तो बात है! " अल्फा म्हणाला, " तोंड दाखवून येतो. सकाळ फुकट जाणार माझी, पण काही पर्याय नाही. माझ्या दृष्टीने आजची रात्र महत्त्वाची आहे. जर आज खंजिराचे कोडे नाही सुटले, तर मग आपण आशा सोडलेलीच बरी. चल, तुला शुभरात्री! मी आता एक एक धागा जोडण्यात माझी रात्र घालवणार आहे. तू सकाळी उठल्यानंतर तुला माझा चेहरा प्रसन्न आणि आनंदी दिसेल, अशी अपेक्षा व्यक्त करूया. झोप तू. "

" गुडनाईट! " मी दिवा विझवला. अल्फाने हेडफोन घातला आणि तो खिडकीच्या दिशेने लांब पाय करून बसला.

रविवार जवळ येत होता...

***

# 6.

सकाळी मला जाग आली तेव्हा सूर्याची किरणे पूर्ण खोलीभर पसरली होती पक्ष्यांचा किलबिलाट ऐकू येत होता. हवेत थोडासा गारवा होता. वातावरण प्रसन्न वाटत होते. अल्फा अजुनही खिडकीपाशीच बसला होता. पण आता त्याच्या हातात अभ्यासाचे पुस्तक होते. मी आवरून आलो आणि त्याने ते मिटून बाजूला ठेवले. तो चांगलाच खुष दिसत होता.

"वा! सकाळ सकाळी चक्क अभ्यास! तुझा तर नूरच पालटलेला दिसतोय! " मी म्हणालो, " किती वाजता उठला आहेस? "

" साडेपाच. " अल्फा उत्तरला, " सकाळी अभ्यास करायला मजा येते रे! मी एवढ्या लवकर उठून पहिल्यांदाच अभ्यास केलाय. असाच रोज एक एक तास अभ्यास केला, तर कदाचित टॉपच मारेन बघ मी! "

" हं. उदंडच! " मी म्हणालो, " रत्नजडित खंजिराच्या केसमध्ये कुठेतरी हरवलेला धागा सापडलाय, असं दिसतंय. तुझा चेहराच बोलतोय. "

" अगदी बरोब्बर ओळखलंस बघ.. " अल्फा उत्साहाने म्हणाला, " मला काहीतरी मिळालेय. एक कल्पना, जी या प्रकरणातील सर्व धाग्यांना जोडते.. खरोखर प्रभव, सत्य हे कधीकधी कल्पनेपेक्षाही विलक्षण असू शकते, याची प्रचिती मला काल विचार करता करताच आली. मला अंदाज नाही, की माझी कल्पना कितपत बरोबर आहे. पण एक गोष्ट मात्र मी खात्रीशीरपणे सांगू शकतो, की माझ्या कल्पनेहून अधिक सत्याच्या जवळ जाणारी दुसरी कोणतीच संभाव्यता असू शकत नाही. "

" अरे भल्या गृहस्था, आणखी किती कोड्यात बोलशील? माझी उत्सुकता ताणून ताणून आता फाटायला आली! सांगून टाक एकदा, तुझी कल्पना काय आहे ते. "

" तूर्तास तरी नाही. " अल्फा म्हणाला, " आज संध्याकाळी आपण समडोळीला जाणार आहोत. त्यावेळी वाटेत मी तुला सर्वकाही सविस्तर सांगेन. "

" समडोळीला? पुन्हा? " मी चक्रावलो.

" होय. रत्नजडित खंजिराच्या शोधातला अर्धा भाग आज पूर्ण होणार आहे. तोपर्यंत तू तुझं कॉलेज वगैरे आटपून घे. तुझं चारचं लेक्चर फार कुरकुर न करता बुडव. आपण संध्याकाळी पाचच्या सुमारास निघणार आहोत."

संदिग्ध मनानेच मी त्याला होकार दिला. आज अल्फाच्या डोळ्यांत एक वेगळंच तेज आणि चेहऱ्यावर एक वेगळाच आत्मविश्वास दिसत होता. पठ्ठ्याला काहीतरी सापडलं होतं, हे नक्की. मला तर कधी एकदा संध्याकाळ होते आणि कधी एकदा आम्ही समडोळीला जायला निघतो, असं झालं.

अखेर संध्याकाळी साडेपाच वाजता अल्फा आणि मी बस स्थानकावर पोहोचलो. समडोळीची सिटी बस तेथे उभी होतीच. त्यामध्ये आम्ही जाऊन बसलो. बस पाचच मिनिटात सुटली. सांगली शहर संपेपर्यंत अल्फा काहीच बोलला नाही. बसने आयर्विन पूल ओलांडला आणि शहर मागे पडले. हळूहळू शेते, माळराने दिसू लागली. मावळतीच्या प्रकाशात उसाचे फड पिवळेधमक दिसत होते. वाऱ्याच्या तालावर डोलत होते. परतीच्या वाटेवरील पक्ष्यांचा किलबिलाट ऐकू येत होता. अल्फाने माझ्याकडे पाहिले. मी उत्सुकतेने त्याच्याच तोंडाकडे पहात होतो. अल्फाने एक हलकेच स्मित केले आणि बोलण्यास सुरूवात केली,

"हं... ठिक आहे तर. आपण या प्रकरणाची चार भागांत विभागणी विभागणी करुया. पहिला - आपल्याकडे काय होते, दुसरा - आपल्याला काय हवे होते, तिसरा - आपण कुठे अडत होतो आणि चौथा - या सर्व प्रश्नांना उत्तरे देणारी माझी कल्पना. किंबहुना तेच

सत्य आहे, असे म्हटले, तरी चालेल. कारण तशी माझी खात्रीच आहे. आता आपण गुन्हा घडला त्या रात्रीपासून विचार करुया. मंगळवारी रात्री अकरा वाजण्याच्या सुमारास हा गुन्हा घडला. तिथे केलेल्या तपासणीत आपल्याला काय मिळाले? रत्नजडित खंजिराची रिकामी पेटी, त्याला लागूनच राहिलेला चाव्यांचा जुडगा, चेअरमनच्या केबिनचे उघडे दार, तेथील टेबलाच्या मागचा दबलेला गालिचा आणि टेबलाला लागलेले ऑईलचे डाग. इतक्या माहितीवरून आपल्याला रत्नजडित खंजिर शोधायचा होता. अर्थातच गुन्हेगाराला चेअरमनच्या केबिनची सखोल माहिती असायला हवी होती आणि काही कारणाने त्याचे हात गाडीच्या ऑईलने माखलेले असायला हवे होते. मग मी पहिला मुद्दा मनात पकडला आणि चेअरमनसाहेबांचे निकटवर्तीय शोधले. पण त्यांमधले कोणीच गुन्ह्याच्या वेळी संग्रहालयात नव्हते. मग मी मुळापासून शोध घेण्याचे ठरविले. न जाणे, या गुन्ह्याशी रखवालदार महादबा पाटलाचे वैयक्तिक कारण जोडलेले असावे, असा विचार मी केला.

आणि माझा अंदाज खरा ठरला. अनिल पाटील हा गुन्हा करण्यासाठी अतिशय पूरक असा माणूस होता. तो धंद्याने मेस्त्री असणे, शिवाय गुन्ह्याच्या रात्री त्याचे सांगलीत असणे या गोष्टी नक्कीच गुन्हेगार म्हणून त्याच्याकडे बोट दाखविणाऱ्या होत्या. आपल्या जागी कोणी पोलीस अधिकारी असता, तर त्याने अनिल पाटलाला पकडले असते आणि मारून मुटकून त्याच्याकडून रत्नजडित खंजिराची माहिती काढून घेण्याचा प्रयत्न केला असता. पण दुसऱ्या बाजूने पाहता, अनिल पाटलाने खंजिर चोरल्याचा कोणता पुरावाही मिळत नव्हता. खंजीर त्याच्या घरीही नव्हता आणि त्याने कोणाला दिलेलाही नव्हता. त्याच्या बायकोनेही सांगितले, की तो रात्री रिकाम्या हातानेच परत आला होता. शिवाय, मी त्या रात्री महादबा पाटलाने मरण्याच्या वेळी जो शर्ट घातला होता, त्याची तपासणी केली होती. त्यावरही मला ऑईलचे काळपट डाग दिसले. पण वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट अशी, की चाव्यांच्या जुडग्यावर, चेअरमनच्या केबिनमधील कपाटावर आणि रत्नजडित खंजिराच्या पेटीवर मात्र हे डाग नव्हते. याचा अर्थ काय? एकाच वेळी अनिल पाटील गुन्हेगार आहे आणि नाही या दोन्ही गोष्टी सिद्ध होत होत्या. शिवाय त्या दबलेल्या गालिचाची गोष्ट वेगळीच. अशा सगळ्या प्रश्नांवर आपली गाडी अडत होती. या सर्वांचा परस्परसंबंध काय?

यावर मी काल बराच उशीर विचार करीत होतो. मी प्रथम या गुन्ह्याचा आढावा घेतला. मंगळवारी रात्री त्या संग्रहालयात दोन गोष्टी घडल्या होत्या - एक म्हणजे रखवालदार महादबा पाटलाचा खुन आणि दुसरी म्हणजे रत्नजडित खंजिराची राची चोरी. आपण आत्तापर्यंत या दोन्ही गोष्टी एकाच गुन्ह्याचा भाग समजत होतो. मग क्षणभरासाठी मी या दोन्ही घटना वेगळ्या करून पाहिल्या आणि माझ्या डोक्यात लख्खकरून प्रकाश पडला. महादबा पाटलाचा खुन आणि रत्नजडित खंजिराची चोरी या दोन वेगवेगळ्या घटना आहेत, हेच खरे या केसचे उत्तर आहे!! केवळ हिच शक्यता आपल्या सर्व अनुत्तरीत प्रश्नांची उत्तरे देऊ शकते..! "

" म्हणजे? " मला काहीच कळाले नाही.

" म्हणजेच," अल्फा म्हणाला, "महादबा पाटलाचा खुन आणि रत्नजडित खंजिराची चोरी या दोन्ही गोष्टी एकाच वेळी आणि एकाच व्यक्तीने केलेल्या असणे बंधनकारक नाहीये. हे दोन गुन्हे दोन वेगवेगळ्या व्यक्तींनी वेगवेगळ्या वेळी केलेले असू शकतात.. आणि तेही स्वतंत्रपणे!!"

"काय?? " मी डोळे विस्फारून म्हणालो, " याचा अर्थ.. ज्याने रत्नजडित खंजिर चोरलेला आहे, त्याने.. त्याने रखवालदाराचा खुन केलेला नाहीये..?? "

" नाहीच मुळी!!! " अल्फा ठासून म्हणाला, " आणि ज्याने रखवालदाराचा खुन केलाय, त्याने रत्नजडित खंजिर चोरलेला नाहीये..!! "

यापेक्षा अधिक अकल्पित काही असूच शकत नव्हते.

" हे बघ, " अल्फा म्हणाला, " अनिल पाटलाचे शत्रुत्व त्याचा सावत्र भाऊ महादबाशी होते. त्यामुळे त्याने त्याचा खुन केलेला असणार, हे नक्की आहे. पण त्याने खंजिर चोरल्याचा पुरावा कुठाय? त्याच्या घरी नाहीये, त्याने कुठे विकलेला नाहीये, खंजिराच्या पेटीवर त्याच्या हातांचे काळे डाग नाहीयेत. या सर्वांचे एकच कारण आहे - अनिल पाटलाने

चोरी केलेलीच नाहीये! प्रकरणाची गुंतागुंत लक्षात येतीय का तुझ्या? या प्रकरणात एक नाही, तर दोन गुन्हेगारांचा समावेश आहे! "

" मग ज्याने खंजीर चोरलाय त्याचे काय? " मी स्तंभित होऊन विचारले.

" ते अजुनही एक कोडेच आहे. खुन आणि चोरी या दोन्ही घटनांमध्ये पाच मिनिटांचे का होईना, पण अंतर आहे. या दोन गोष्टी एकाच वेळेस घडलेल्या नाहीत. मी काढलेल्या निष्कर्षानुसार, खंजीर चोरणारा नक्कीच महादबा पाटलाच्या खुनानंतर आला होता. आणि फार वेळाने नाही. फारतर पाच मिनिटे उशिरा.. "

" हे तू कशावरून म्हणू शकतोस? "

" आणि खंजिराची चोरी होताना महादबा पाटीलसुद्धा संग्रहालयात उपस्थित होता. "

" अल्फा!! आता मात्र तू कहर करतोयस!! माझं डोकं हळूहळू सुन्न पडायला लागलंय. तू हे कशाच्या आधारावर बोलतोयस? " मी अविश्वासाने विचारले.

" चेअरमनच्या केबिनमधला तो दबलेला गालिचा!! " अल्फा आपले गूढतेने भरलेले डोळे माझ्यावर रोखत म्हणाला, " आपण समजत होतो, की गुन्हेगार टेबलाखाली काहीतरी शोधण्यासाठी खाली वाकला असावा. पण तसे घडले नव्हते. तेथे अनिल पाटील बसला होता. नक्कीच वाकलाही होता. पण काही शोधण्यासाठी नव्हे, तर स्वतःला वाचविण्यासाठी! स्वतःला लपविण्यासाठी!! संग्रहालयात सर्वप्रथम अनिल पाटील आला. त्याच्या पावलांचा आवाज ऐकून महादबा पाटील आत आला. अनिलने सराईतपणे त्याच्या छातीत चाकू घुसवून त्याला ठार केले. त्याचे काम आता फत्ते झाले होते. तो तेथून बाहेर पडणार, इतक्यात त्याला कोणीतरी येत असल्याची चाहूल लागली असावी. त्यामुळे नक्कीच तो गडबडला असणार. त्या दालनात लपण्यासारखी कोणतीच जागा नव्हती. मग त्याला चेअरमनची केबीन दिसली असावी, तीही लॉक न केलेली. मग येणाऱ्या व्यक्तीने पहायच्या

आतच तो केबिनमध्ये घुसला. ही दुसरी व्यक्ती म्हणजे आपला दुसरा गुन्हेगार- रत्नजडित खंजिराचा चोर असणार, यात शंकाच नाही. ती व्यक्तीदेखील काही मिनिटातच चेअरमनच्या केबिनमध्ये शिरली असावी, त्या पेटीच्या चाव्या मिळविण्यासाठी. त्यावेळी हा अनिल पाटील त्याच केबिनमध्ये होता, चेअरमनच्या टेबलाच्या मागे अंग चोरून बसला होता. मागहून आलेली व्यक्ती संग्रहालयातून निघून गेल्याची खात्री होईपर्यंत तो घाबरून तेथेच बसून राहिला असावा. त्यामुळेच त्याच्या हाताचे काळपट डाग टेबलाच्या बाजूला लागले आणि गालिचा त्याच्या बराच वेळ बसण्याने खोल दबला गेला असावा. केवळ हा घटनाक्रम धरून आपण चाललो, तरच आपल्याला आपल्या न सुटलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळतात. मला तर खात्री आहे. सत्य हे यापेक्षा वेगळं काही असूच शकत नाही. "

मी अल्फाकडे पहातच राहिलो होतो. मला काय प्रतिक्रिया द्यावी, तेच कळेना.

" मी पूर्णपणे निःशब्द झालोय अल्फा... " मी म्हणालो, " असे खरोखर घडू शकते?? "

" घडू शकते नाही, असेच घडलेले आहे प्रभव!!" अल्फा म्हणाला, "या घटनेतील दोघांपैकी एका गुन्हेगाराला पकडायला आत्ता आपण निघालेलो आहोत. मला वाटतेय, की या अनिल पाटलाला खंजिराच्या चोराबद्दल काही माहिती असण्याची दाट शक्यता आहे. कोण जाणे, त्याने त्याच्या चेहराही पाहिला असावा - त्या टेबलाच्या मागे लपून!! त्यामुळे अनिल पाटील हे पात्र आपल्या नाट्यात खूप महत्त्वाची भूमिका बजावणार आहे. अर्धा तास थांब. अर्ध्या तासात हे प्रकरण अगदी काचेसारखे पारदर्शक होईल बघ. "

इतके बोलून अल्फा पुन्हा खिडकीतून बाहेर पाहू लागला. मला अखेर अल्फाच्या कल्पनाशक्ती आणि बुद्धिमत्तेचा साक्षात्कार पहायला मिळाला होता. हे सर्व अशा प्रकारे घडले होते, की त्यापुढे कविकल्पनाही फिकी पडावी!! अल्फाच्या तर्काची पडताळणी काही वेळात अनिल पाटलाच्या तोंडूनच होणार होती. त्यामुळे डोक्याला फार ताण न देता मी शांत बसून राहिलो. अखेर आमची बस गावात येऊन पोहोचली.

***

# 7.

बस जेव्हा समडोळी गावात येऊन थांबली, तेव्हा अंधार पडला होता. सर्वत्र दिवे लागलेले होते. मी अल्फाच्या मागोमाग चालू लागलो. दहा मिनिटे चालल्यानंतर एका छोटेखानी वर्कशॉपसमोर येऊन आम्ही थांबलो. त्या वर्कशॉपवर बोर्ड होता-

'श्रीराम रिपेअर्स '

प्रो. प्रा. अनिल पाटील

म्हणजे हेच अनिल पाटलाचे गॅरेज होते. अल्फा आणि मी आत शिरलो. आतमध्ये एक थोडा बुटका, पण अंगाने मजबूत, भरघोस मिशा असलेला, तपकिरी डोळ्यांचा असा एक माणूस सोडून कोणीच नव्हते. त्याचा पोषाख आणि हात ऑईलच्या काळ्या रंगाने माखलेले होते आणि तो एका गाडीची रिपेअरी करीत होता. अल्फा आणि मी त्याच्या नजरेस पडताच आपले काम थांबवून तो आमच्याकडे पाहू लागला.

"शुभसंध्या,  श्री. पाटील. " अल्फा म्हणाला.

" आपण?" अनिलने गोंधळून विचारले.

"मी अल्फा. मी एक गुप्तहेर आहे. पोलिसांच्या मदतीसाठी मी स्वतंत्रपणे काम करतो. हा माझा सहकारी प्रभव. "

" बरं, मग? " त्याने काहीशा रागीटपणे विचारले.

" आठ तारखेला सांगलीच्या संग्रहालयात घडलेल्या गुन्ह्याबद्दल आम्हाला तुमच्याशी काही बोलायचे आहे. " अल्फा म्हणाला.

" आणखी काय बोलायचे शिल्लक आहे? पोलीसांना तर मी माझ्या भावाची सगळी माहिती दिलेली आहे! " अनिल थोडासा बावरलेला दिसला.

" पहिली गोष्ट म्हणजे, पोलिसांचे आणि आमचे काम स्वतंत्र आहे. त्यांच्या चौकशीशी आमचा काहीएक संबंध नाही. आणि दुसरी गोष्ट म्हणजे, आम्हाला जी माहिती अपेक्षित आहे, ती अजून तुम्ही दिलेलीच नाहीये. तेव्हा तुम्ही तुमच्या हातातले काम थोडा वेळ बाजूला ठेवून आम्हाला मदत केली, तर फार बरं होईल. " मोघम भाषेत अल्फा म्हणाला. थोडे वैतागूनच अनिलने हात धुतले आणि बाजुच्या टेबलामागे असलेल्या खुर्चीवर जाऊन तो बसला.

" बसा. " तो म्हणाला. अल्फा आणि मी समोरच्या दोन खुर्च्यांवर बसलो.

" गावात तुमची होणारी वानवा टाळायची असेल, तर प्रथम गॅरेजचे दार लावून घ्या. " अल्फा म्हणाला.

" कसली वानवा? काय म्हणायचेय तुम्हाला?? "

" मी तुम्हाला व्यवस्थित स्पष्टीकरण देतो. पहिला सांगतोय तसे करा. "

थोड्या घुश्श्यातच अनिल उठला आणि त्याने गॅरेजचे दार लावून घेतले.

" आम्हाला तुमच्याशी 9 तारखेला पेपरात आलेल्या बातमीसंबंधी प्रथम चर्चा करायची आहे. " अल्फा म्हणाला.

" कुठली बातमी? "

अल्फाने पेपर त्याच्या हातात दिला. अनिलने बातमी वाचली-

'सांगलीच्या संग्रहालयात चोरीचा प्रयत्न '

" मी ही बातमी वाचली आहे. " तो म्हणाला.

" मग तुम्हाला हे ठाऊक असेलच, की त्या बातमीमध्ये चोरीचा प्रयत्न असफल झाल्याचे आणि चोरांनी तुमचा सावत्र भाऊ महादबाचा खुन केल्याचे छापले होते.. "

" हो, ठाऊक आहे. " अनिल म्हणाला.

" तुम्हाला हेही ठाऊक असायलाच हवं, की ही बातमी खोटी होती आणि आणि आदल्या रात्री संग्रहालयात काही वेगळ्याच घटना घडल्या होत्या.. " अल्फा आपली नजर अनिलवर रोखत म्हणाला. क्षणात अनिलचा चेहरा भीतीने भारून गेला.

" हे... हे.. मला ठाऊक असण्याचं.. कारण.. क्... काय... मला.. मला नाही ठाऊक.. "

" तुम्हाला ठाऊक असायलाच हवं!! ही गोष्ट ठाऊक असणारी हातच्या बोटावर मोजण्याइतकीच माणसं आहेत आणि त्यांपैकीच तुम्ही एक आहात, श्री अनिल पाटील!! आणि तुम्हाला ही गोष्ट माहित असण्याचे कारण म्हणजे, गुन्हा घडला तेव्हा तुम्ही खुद्द तेथे उपस्थित होता..!! "

आता मात्र अनिलच्या चेहऱ्यावरील भीतीचे भाव रागामध्ये परिवर्तीत झाले.

" पुरे झाला हा मूर्खपणा!! आत्ताच्या आत्ता माझ्या गॅरेजमधून बाहेर व्हा, नाहीतर तुमचेही काम फत्ते करून टाकेन! " तो चवताळून ओरडला.

" मी पोलीसांना कळविले आहे, श्री पाटील. " अल्फावर त्याच्या चिडण्याचा काडीमात्रही परिणाम झाला नाही, "ते काही वेळातच येथे पोहोचतील. तुमच्या भावाचा खुन आधीच तुमच्या खात्यावर आहे. आम्हाला मारून त्यात आणखी दोघांची भर घालायची, की आम्हाला मदत करून शांतपणे यातून मार्ग काढायचा, हे आता तुमच्या हातात आहे."

पोलिसांचे नाव काढताच अनिल गर्भगळीत झाला.

"प्.. पण... कशावरून... कशावरून मी खुन केलाय... क्.. काय पुरावा आहे... तुमच्याकडे?? "

" चेअरमनच्या टेबलाच्या बाजूला तुमच्या हातांच्या अॉईलचे काळपट डाग लागलेले आहेत. खुन झाल्याच्या रात्री तुम्ही सांगलीतच आला होता, याचेही पुरावे आमच्याकडे आहेत. या साऱ्या गोष्टी तुमच्या विरोधात असताना तुम्ही तुमचा बचाव करू शकत नाही. तेव्हा लवकर सत्य सांगून टाका. कदाचित पोलीसांपासून आम्ही तुमचा बचाव करू शकू.. "

हे ऐकल्यानंतर मात्र अनिलचा धीर संपला. त्याने दोन्ही हातांनी आपला चेहरा झाकून घेतला. मी आणि अल्फा तो काय करेल, याचा विचार करीत त्याच्याकडे पाहू लागलो. शेवटी अनिलने मान्य केले.

" होय, मीच मारलेय महादबाला!! " दुखावलेल्या स्वरात अनिल म्हणाला, " मंगळवारी रात्री. माझ्या डोक्यामध्ये संतापाने इतके थैमान घातले होते, की.. संपवलं त्याला मी... याच हातांनी..!! "

" पण फक्त जमिनीच्या साध्याशा वाटणीवरून तुम्ही इतकी खालची पातळी गाठलीत?? तुम्ही कोर्टातही जाऊ शकला असता. " अल्फा कठोरपणे म्हणाला.

" या प्रकरणात जमिनीचा प्रश्न कुठेच नव्हता. " अनिल म्हणाला, " महादबाचे म्हणणे होते, की मी मोठा भाऊ असल्यामुळे सगळी जमीन माझ्याच वाट्याला यायला हवी. त्याच्या या वक्तव्याची मला मनस्वी चीड आली होती; आणि ते स्वाभाविकच होते. पण या कारणासाठी मी त्याचा खुन नाही केला. आमच्यात बरेच वाद झाले. पण इतक्यावरून मी त्याचा खुन करणे शक्यच नव्हते. पण जेव्हा एखादा माझ्या बायकोबद्दल दुष्ट विचार करीत असेल, तर माझा संतापाने तिळपापड का होऊ नये? "

" काय?? " आम्हाला धक्काच बसला.

" होय. " अनिल म्हणाला, " मी काही फार विस्ताराने सांगत नाही, कारण ती गोष्ट माझ्याच्याने बोलवतही नाही. महादबा माझ्या पत्नीबद्दल असे उलटसुलट विचार करीत

असेल, असे वाटलेही नव्हते. माझ्या पत्नीने मला दोन - तीनदा बोलूनही दाखविले होते. पण मी मोठा भाऊ म्हणून मनावर दगड ठेवून ते दडपण्याचा प्रयत्न केला होता. माझी पत्नी महादबाच्या पत्नीपेक्षा तरूण, सुंदर आणि निश्चितच जास्त शिकली - सवरली आहे. त्यामुळे त्याच्या मनात माझ्याबद्दल तिरस्कार भरला होता. गेल्या आठवडय़ात मात्र त्याने कहरच केला. त्याने माझ्या पत्नीची वाट अडवली आणि तिला नाही नाही ते बोलला. तेव्हा मात्र माझी सहनशक्ती संपली. एकवेळ त्याने सगळी जमीन आपल्या नावावर करून घेतली असती, तरी मी मान्य केले असते. पण हे मी खपवून घेणार नव्हतो. मग मंगळवारी रात्री मी संधी साधली आणि संग्रहालयात जाऊन त्याचा खेळ संपविला.. मी ज्या परिस्थितीत हे कृत्य केले, त्याला अनुसरून तुम्हीच सांगा, मी काय चुकीचे केले? "

अल्फा आणि मी काही वेळ शांत बसलो. अनिलच्या डोळयांतून अश्रू वाहू लागले.

" तुमच्या जागी उभे राहून विचार केला, तर तुमची कृती अतिशय योग्य आहे, श्री पाटील. अशा परिस्थितीत एखाद्या निष्ठावान पतीने जे केले असते, तेच तुम्ही केलेय. पण कायद्याच्या दृष्टीने हा एक गुन्हाच आहे. दुष्ट लोकांना शिक्षा देण्याचे काम पोलिसांचे आहे, तुमचे नाही. त्यामुळे तुम्हीही एक गुन्हेगारच ठरता. तुम्ही असे करायला नको होते. " अल्फा म्हणाला.

" मला जाणवतंय ते आता. " अनिल मुसमुसत म्हणाला, " पण संतापाने तेव्हा माझ्या अंगाची लाही लाही झाली होती. त्यामुळे माझा माझ्या मनावरचा ताबा सुटला आणि.. आणि मी.. त्याला मारून टाकलं..!! खरंच चूक झाली माझी... "

" आता रडू नका. जे झालं ते झालं. " अल्फा म्हणाला, " यात तुमच्या दुर्दैवाने की काय,  पण तुम्ही ज्या ठिकाणी आणि ज्या वेळी हे कृत्य केलेले आहे, ते ठिकाण आणि ती वेळ इतकी अजब होती, की त्यामुळे खुपच मोठी गुंतागुंत होऊन बसली आहे. रत्नजडित खंजिर तुमच्या उपस्थितीतच चोरला गेला आहे आणि तुम्ही केलेल्या खुनामुळे चोराचे

चांगलेच फावले आहे. त्याला सराईतपणे खंजिरावर हात मारणे शक्य झाले. आता आम्हाला तुमच्याकडून खुप अपेक्षा आहेत. सर्वप्रथम आम्हाला सांगा महाशय, तुम्ही त्या मागहून आलेल्या व्यक्तीला पाहिले होते का? "

" नाही. " अनिल म्हणाला, " मी त्या व्यक्तीला पाहिले नाही. माझे मन इतके सैरभैर झाले होते, की मला स्वतःचा बचाव करण्याशिवाय काहीच सुचले नाही. "

" च्.. च्.. च्.. " अल्फा हळहळला, " मला तुमच्या याच उत्तराची भीती वाटत होती. हरकत नाही. मला आता तुम्ही संग्रहालयात शिरल्यापासून ते तेथून बाहेर पडेपर्यंत काय काय घडले, ते इत्यंभूत सांगा. अगदी क्षुल्लक वाटणारी घटनाही सोडू नका. "

" ठिक आहे. " अनिल म्हणाला, " मंगळवारी रात्री सव्वादहा वाजण्याच्या सुमारास मी संग्रहालयात गेलो होतो. तसे म्हटले तर संध्याकाळपासून मी सांगलीतच होतो. हे कृत्य करण्यासाठी माझे मन तयार करण्यात बराच वेळ गेला. सव्वादहा वाजता मी संग्रहालयाच्या मागच्या गेटपाशी आलो. महादबा तेथे नव्हता. मग मी आत जाण्याचे ठरविले. कोणी पहात नाही, हे पाहून मी खिडकीतून उडी मारून आत शिरलो आणि महादबा आत येण्याची वाट पाहू लागलो. सुदैवाने काही वेळात तो आत आला. मी संधी साधून त्याच्या छातीत सुरा खुपसला आणि त्या दुष्टाला संपविला. त्यानंतर पुढची दोन मिनिटे मी स्वतःला शांत करण्यासाठी तसाच उभा होतो. मग तो रक्ताळलेला चाकू मी काढून घेतला. मी जवळपास निघण्याच्या तयारीतच होतो, तितक्यात मला वरून कोणाचातरी आवाज आला. मी जिथून आत शिरलो, त्याच बाजूने कोणीतरी येत होते. माझी तर बोबडीच वळली. हॉलमध्ये लपण्यासारखी कोणतीच जागा नव्हती. मला चेअरमनची केबीन खुली दिसली. मी ताबडतोब आतमध्ये शिरलो आणि टेबलामागे लपलो. ती व्यक्ती हॉलमध्ये काही वेळ थांबली आणि थेट मी जेथे होतो त्याच केबिनमध्ये शिरली. तेव्हा तर मी अपादमस्तक थरथरू लागलो. मला वाटलं, आता सगळा खेळ संपला! पण त्या व्यक्तीचे केबिनमध्ये इतरत्र लक्ष नव्हते बहुतेक. कारण मला चेअरमनचे कपाट उघडण्याचा आवाज आला आणि मिनीटभरातच पुन्हा केबिनचे दार बंद झाल्याचा. काय चाललेय मला काहीच

कळत नव्हते. ती व्यक्ती रखवालदार आहे, की आणखी कोण याचा काहीच थांगपत्ता लागेना. पण मी ते जाणून घेण्याचे धाडसही केले नाही. माझे अस्तित्व त्याला जाणवणार नाही, अशा बेताने मी आहे त्याच जागी चुपचाप बसून राहिलो. बऱ्याच वेळाने मला बाहेरच्या दालनातून काही हालचाल ऐकू येईनाशी झाली. मग धीर एकवटून मी दार उघडले. बाहेर कोणीच नव्हते. थोड्या निरीक्षणातच माझ्या लक्षात आले, की महादबा जेथे पडला होता, त्याच्या बाजूच्याच पेटीतला तो सुप्रसिद्ध रत्नजडित खंजिर नाहीसा झाला होता. पेटी उघडीच होती आणि किल्ली तशीच लॉकमध्ये अडकली होती. माझ्यावरती किती मोठे संकट येऊ घातले होते, याची जाणीव मला झाली. त्या क्षणी अगदी कोणीही मला तेथे पाहिले असते, तर खंजिर चोरल्याचा आळ माझ्यावरच आला असता. त्यामुळे तडक मी संग्रहालयाच्या बाहेर पडलो आणि तेथून शक्य तितक्या दूरवर गेलो. "

" म्हणजे तुम्ही त्या व्यक्तीला पाहिले नाही?" मी पुन्हा विचारले.

"नाही. " अनिल म्हणाला, " पण.. एक मिनीट.. मी त्या व्यक्तीची सावली पाहिलेली आहे!! "

" काय सांगता?? " अल्फा एकदम उत्साहाने उडी मारून म्हणाला.

" होय. मी केबिनमध्ये ज्या टोकाला लपून बसलो होतो, त्याच्या विरुद्ध दिशेला, कपाटाच्या लगतच एक खिडकी  होती. तेथून येण्यऱ्या चंद्रप्रकाशात मी त्या व्यक्तीची सावली पहिली होती. काही क्षणांसाठी. " अनिल म्हणाला.

" मग तुम्ही त्या व्यक्तीचे, म्हणजेच, मला म्हणायचंय की तिच्या सावलीचे ढोबळ वर्णन करू शकाल का? "

" अं.. तसे मी अगदी लक्षपूर्वक पाहिले नव्हते ; कारण माझ्या मनात त्यावेळी भीतीशिवाय दुसरे काहीच नव्हते. पण ती व्यक्ती बऱ्यापैकी सडपातळ आणि उंच होती.

पायांत बूट होते, हेदेखील मी खात्रीशीरपणे सांगू शकतो. केस विस्कटलेले होते, कपडे बऱ्यापैकी ढगळे होते. यापेक्षा जास्त काही कळणे शक्यच नव्हते.. "

" खुपच छान... " अल्फा ते सगळे डोक्यात साठवून घेत म्हणाला, " त्या व्यक्तीने केबिनमध्ये शिरल्या शिरल्या थेट कपाटच उघडले? "

" होय. त्याने दुसरीकडे कुठेच लक्ष दिले नाही. " अनिल म्हणाला, " आणखी एक गोष्ट, जी मला ती व्यक्ती केबिनमध्ये प्रवेशल्यानंतर जाणवली. "

" कोणती?? " अल्फा आणि मी दोघांनीही एकदमच विचारले.

" त्यावेळी मला हलकासा आयोडीनचा वास आला - जसा दवाखान्यात गेल्यावर येतो तसा... "

" वा! वा! श्री पाटील, ही फारच महत्त्वाची माहिती दिलीत तुम्ही. आणखी काही आठवतंय का? " अल्फा खुष होऊन म्हणाला.

" नाही.. आणखी त्या व्यक्तीबद्दल मला काहीच कळू शकले नाही. " अनिल म्हणाला.

" हं.. हरकत नाही. एवढ्या माहितीवर गुन्हेगाराला शोधण्यास थोडे कष्ट पडतील ; पण गुन्हेगार नक्की सापडेल." अल्फा म्हणाला.

"मला तुम्हाला दोनच प्रश्न विचारायचे आहेत, श्री अल्फा, ज्याबाबत मी अजून संभ्रमात आहे. " अनिल पाटील म्हणाला, " पहिला म्हणजे, रत्नजडित खंजिर चोरीला गेलेला मी स्वतः पाहिला होता. तरीही दुसऱ्या दिवशीच्या पेपरात छापून आले, की रत्नजडित खंजिर सुरक्षित आहे. हा काय प्रकार आहे? त्या बातमीने मला बुचकळ्यातच टाकले. माझी पाहण्यात चूक झाली की काय, असे मला वाटू लागले. आणि दुसरी गोष्ट म्हणजे, खंजिराचा चोर मी नसून दुसराच कोणीतरी आहे, हे तुम्ही कसे ताडले? त्या ठिकाणची परिस्थिती अशी

होती, की कोणालाही असे वाटावे, चोराने रखवालदाराचा खुन करून खंजिर हस्तगत केला आहे..!! "

अल्फाने स्मित केले.

" तुमच्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर - रत्नजडित खंजिर हा एक महान ऐतिहासिक वारसा आहे. त्याची किंमत कोट्यावधींच्या घरात आहे. तो चोरीला गेल्याची बातमी फुटली असती, तर मोठी खळबळ माजली असती. खूप मोठे राजकारण होण्याची शक्यता होती. शिवाय संग्रहालयाच्या समितीला निलंबित केले गेले असते. मग आम्ही यातून हा मार्ग काढला. चोरी करण्याचा फक्त प्रयत्न झाला आहे, असा देखावा केला. रत्नजडित खंजिरासारखा दिसणारा एक खंजिर तेथे आणून ठेवला आणि सत्यावर पडदा टाकला. त्यामुळे खरी घटना कोणालाच ठाऊक नाही. आणि दुसरी गोष्ट म्हणजे, चेअरमनच्या टेबलाच्या बाजूचा दबलेला गालिचा. त्यानेच आम्हाला तुमच्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर दिले. कारण खंजिराच्या चोराचे त्या ठिकाणी काहीच काम नव्हते. त्याला फक्त कपाटातून चावी घ्यायची होती. मग त्या दबलेल्या गालिचाच्या ठिकाणी दुसरी एखादी व्यक्ती का असू नये, असा मी विचार केला. शिवाय तुमच्या हातांचे काळे डाग महादबाच्या शर्टावर असणे आणि खंजिराच्या पेटीवर, चाव्यांच्या जुडग्यावर किंवा कपाटावर नसणे, हेदेखील सूचक होते. मग थोड्या खोलवर विचाराअंती हाच निष्कर्ष निघाला, की काळे डागवाला, महादबा पाटलाचा खुनी ही एक व्यक्ती आहे आणि रत्नजडित खंजिराचा चोर ही दुसरीच कोणीतरी व्यक्ती आहे!! हे झाले तुमच्या दुसऱ्या प्रश्नाचे स्पष्टीकरण..!!! "

" तुमच्या विचारशक्तीचे आणि निरीक्षणक्षमतेचे कौतुक करावे तितके थोडेच आहे, श्री अल्फा.. " भारावून जाऊन अनिल पाटील म्हणाला. पण लगेचच त्याचा चेहरा पडला, " पण आता सगळं संपलंय.. पोलीस कधीही इथे येऊन मला बेड्या ठोकतील... माझी पत्नी, माझ्या मुलांचे काय होईल?? माझ्या अविचारीपणाचा फटका त्यांना बसेल, याचा विचारच मी केला नव्हता... "

त्याने नैराश्याने डोक्याला हात लावला. ते पाहून अल्फा हसायला लागला. अनिल आणि मी अल्फाला मधूनच काय झाले, म्हणून विचीत्रपणे त्याच्याकडे पाहू लागलो.

" माझे बोलणे तुम्ही इतके गंभीरपणे घ्याल असे वाटले नव्हते. " अल्फा म्हणाला, " जर रत्नजडित खंजिर चोरीला गेलाय, हे पोलीसांना ठाऊकच नसेल, त्याच्या शोधात पोलिसांची मदत घेणे निरर्थकच नाही का?? तुम्ही आम्हाला अपाय करू नये, यासाठीच फक्त मी 'पोलीस' हा शब्द वापरला. असो. तुम्हाला कोणाहीपासून काहीही धोका नाहीये. फक्त इथून पुढे इतकीच काळजी घ्या, की कुठलेही प्रकरण कोणाच्या जीवावर बेतण्यापर्यंत जाऊ नये. कायद्याच्या दृष्टीने तुम्ही गुन्हेगारच आहात. पण नियतीनेच तुम्हाला आणखी एक संधी दिली आहे. तेव्हा व्यवस्थित रहा. तुम्ही दिलेल्या अनमोल माहितीबद्दल धन्यवाद!! चल प्रभव. आता राहिलेले काम फत्ते करण्याच्या मागे लागूया. "

असे म्हणून अल्फा तेथून उठलाच. अनिल पाटलाने भारावून म्हटलेले 'धन्यवाद' अल्फाला ऐकूही आले नाहीत. त्याला आता डोळयांसमोर केवळ उंच, सडपातळ आणि विस्कटलेल्या केसांची व्यक्तीच दिसत होती..!!!

***

# 8.

" अमेझिंग!! " मी भलताच प्रभावित झालो होतो, " जस्ट अमेझिंग!! तुझ्या विचारशक्तीला सलाम आहे अल्फा!! तू एखाद्या निष्णात गुप्तहेरासारखा काम करतोयस. "

ती शनिवारची सकाळ होती. माझ्या कॉलेजला सुट्टी होती आणि अल्फाने त्याच्या कॉलेजला नेहमीप्रमाणे दांडी मारली होती. काल समडोळीहून उशिरा परतल्यानंतर सकाळी आम्ही दोघेही जरा उशीराच उठलो होतो. कालच्या यशामुळे आमचे मन आनंद आणि उत्साहाने भरून आले होते.

" तुला काय वाटले, मी फक्त हवेतच गोळ्या मारत होतो? मी काही एखाद्या निष्णात गुप्तहेरापेक्षा कमी नाहीये बरं का!! "अल्फा नाटकीपणे म्हणाला, " चला. एक गोष्ट तर चांगली झाली. आता इथून पुढे मी माझी ओळख 'एक गुप्तहेर' अशी करून दिल्यावर निदान तू गालातल्या गालात हसणार तरी नाहीस! "

अल्फाने माझ्याकडे बघून डोळा मारला. मला थोडे वरमल्यासारखे वाटले.

" तू मला हसताना पाहिलं होतंस तर. " मी म्हणालो.

" होय. " अल्फा हसून म्हणाला, " असू दे रे. मला काही फरक पडत नाही. सगळ्यांनाच प्रथमदर्शनी मी कोणी गुप्तहेर वगैरे असेन असे वाटत नाही. माझा अवतारच असा विचित्र असतो, त्याला तुम्ही तरी काय करणार! "

मी त्याच्या उभ्या केलेल्या केसांकडे पाहून हसलो.

" बरं. महाशय, आता पुढे काय करायचे आहे, त्याचा विचार करा. " मी म्हणालो.

" सडपातळ, विस्कटलेल्या केसांची व्यक्ती. " अल्फा विचार करीत म्हणाला, " ज्याअर्थी त्या व्यक्तीच्या शरीराला आयोडीनचा वास येत होता, त्याअर्थी तिचा दवाखान्यात वावर असला पाहिजे. शिवाय, पायांत बूट होते, म्हणजे ती कोणी हलकीफुलकी व्यक्ती नसावी. कदाचित एखादा डॉक्टर.. "

" त्यावेळी रखवालदार तुकारामने एका डॉक्टरचे नाव सांगितले होते ना? चेअरमनसाहेबांचे निकटवर्तीय..?? " मला एकदम आठवले.

" डॉक्टर शिंगारे. " अल्फा निर्विकारपणे म्हणाला, " पण काहीही फायदा नाही. अनिल पाटलाने केलेल्या वर्णनाशी डॉ. शिंगारेंची शरीरयष्टी मुळीच जुळत नाही. तो तर चांगला गुबगुबीत माणूस आहे. त्यातच, त्यांना टक्कल आहे. "

" मग? आता काय?? " माझा चेहरा थोडासा पडला. अल्फा विचारांत बुडाला. तितक्यात त्याचा मोबाईल खणाणला.

" हॅलो.. " अल्फा बोलला, " हां बोला सर. "

फोन वाघमारे सरांचाच असणार, मी ताडले. फोनवर बोलतानाच अल्फाचा चेहरा चिंताग्रस्त झाला. मिनीटभरात त्याने फोन ठेवला.

" काय झाले? काय सांगितले वाघमारे सरांनी? " मी कुतूहलाने विचारले.

" सुधाकर लिमयेंची तब्येत ढासळली आहे. " अल्फा म्हणाला, " संग्रहालयाचे चेअरमन. त्यांना जेवणही जात नाहीये म्हणे. आपल्याला त्यांना भेटून यायला हवे. "

" कुठल्या हॉस्पिटलमध्ये ॲडमिट आहेत ते? "

" अं हं. हॉस्पिटलमध्ये नाही. घरीच औषधपाणी चालू आहे त्यांच्या. आपण आत्ताच निघूया, आवरून. मार्केट यार्डालगत त्यांचे घर आहे. कोण जाणे, आपल्याला तेथेच कोणीतरी सडपातळसा चेअरमनचा निकटवर्तीय भेटेल कदाचित.. "

अर्ध्या तासातच आम्ही लिमयेसाहेबांच्या घरापाशी होतो. चेअरमनसाहेबांचे घर छोटेखानी, दुमजली आणि सुटसुटीत होते.

" या रे पोरांनो. " दार वाघमारेंनीच उघडले, " वरती चला. लिमये सरांची रूम वरती आहे. आणि हो.. ", वाघमारेंनी अल्फाकडे करड्या नजरेने पाहिले.

" नीट सभ्यपणे वाग. लिमये हे खुप बडे गृहस्थ आहेत. त्यांची तब्येत बरीच खालावली आहे. त्यामुळे रत्नजडित खंजिराबद्दल काही विचारले, तर तपासात बरीच प्रगती आहे, असे सांग. तेवढाच त्यांना धीर मिळेल. "

" हो सर. " अल्फा म्हणाला. बिचाऱ्या वाघमारेंना माहितीच नव्हते, की तपासात त्यांच्या कल्पनेपेक्षाही 'बरीच' प्रगती झाली होती. वाघमारे वरती जाताच अल्फाने माझ्याकडे पाहून डोळे मिचकावले.

दारालगत असलेला जिना आम्ही चढलो. खालच्या मजल्यावर हॉल व किचन इतकेच होते. घर बऱ्याच वर्षांपूर्वी बांधले असावे. जिन्याच्या पायऱ्या लाकडी होत्या. वरच्या मजल्यावर आणखी दोन खोल्या होत्या. वाघमारे पहिल्या खोलीत शिरले आणि त्यांच्या मागोमाग आम्हीही शिरलो. आतमध्ये जाडेल्या देहाचे, बुटके आणि पांढऱ्या कोटमधले डॉक्टर उभे होते आणि शिवाय श्री सावंत, म्युझियमचे संचालकही तेथे होते.

"या, अल्फा आणि प्रभव. " सावंत म्हणाले. त्यांच्या बाजूलाच पलंगावर एक वृद्ध मनुष्य पहुडला होता. तुरळक, काळे - पांढरे, अस्ताव्यस्त असे केस, सुरकुतलेला आणि मलूल पडलेला चेहरा, खंगलेला देह अशी त्यांची स्थिती त्यांना बसलेला धक्का दर्शवित होती. वय साठीच्या उंबरठ्यावरचे असावे. त्यांना घरातच सलाईन लावले होते.

"लिमये सर, हे दोन तरूण म्हणजे अल्फा आणि प्रभव. वाघमारे सरांचे सहाय्यक. रत्नजडित खंजिराचा छडा लावण्यात हे वाघमारेंची मदत करीत आहेत. " श्री सावंतांनी लिमयेंना सांगितले.

" अच्छा.. " लिमये क्षीण आवाजात म्हणाले, " तपास कुठपर्यंत आलाय मग? काही सुगावा लागला का..? "

" होय सर. काही महत्त्वाची माहिती हाती लागली आहे आमच्या. आणखी थोडा शोध घेणे आवश्यक आहे. आम्ही गुन्हेगारापासून फार लांब नाही. "

" खुपच छान.. खुपच छान.. " लिमये स्मित करीत म्हणाले, " रत्नजडित खंजिर हा संग्रहालयाचा प्राण आहे. तो त्याच्या मुळ जागी प्रस्थापित झाल्याखेरीज मला काही शांती मिळणार नाही. मी तुम्हाला विनवणी करतो.. कृपया तो खंजीर लवकरात लवकर शोधून काढा आणि तो चोरणाऱ्या दुष्टाला चांगलीच अद्दल घडवा. हे प्रकरण आपल्याखेरीज आणखी कोणाला कळालेले तरी नाही ना? "

" नाही, लिमयेसाहेब. ही गोष्ट आम्ही अतिशय गुप्त ठेवली आहे. " वाघमारे म्हणाले.

" चांगली गोष्ट आहे. " लिमये म्हणाले, " हे प्रकरण पोलीसी अखत्यारीत गेलेले नसल्यामुळे तुम्हाला हवी ती कृती झटकन करण्याचे स्वातंत्र्य आहे. त्याचा तुम्ही फायदा उठवा. उद्या संग्रहालयाच्या तपासणीचा दिवस आहे. त्या तपासणीत जर संग्रहालयातील खंजीर खोटा आहे असे आढळले, तर हाहाकार होईल.. त्यामुळे शक्य तितक्या लवकर पावले उचला. "

" आम्ही तुम्हाला आश्वासन देतो. आम्ही उद्याच्या आत तो खंजीर शोधून काढू. गुन्हेगाराची रुपरेषा सध्या आमच्यापाशी आहे. फक्त ती व्यक्ती आमच्या नजरेस पडायची बाकी आहे. " अल्फा म्हणाला.

" काय सांगता..?? " विस्मयाने लिमये म्हणाले, " वाघमारे साहेब, तुमची ही मुलं फार तल्लख आणि तरबेज दिसतात! "

" अं.. हो ना.. तसं मी पहिलाच प्लॅनिंग केलं होतं. हे दोघे फक्त त्यानुसार काम करीत राहिले आणि त्यामुळेच आम्ही या प्रकरणात बरेच खोल जाऊ शकलो. " वाघमारे म्हणाले.

" गुड, गुड! समाधानकारक प्रगती आहे. तुम्ही गुन्हेगाराला लवकरच शोधाल, अशी आशा वाटते. " लिमये म्हणाले.

" श्री लिमये, तुम्हाला आता विश्रांतीची गरज आहे. आत्ता थोडा चहा आणि बिस्किटे खाऊन गोळ्या घेतल्यात, तर बरं होईल. " डॉ. शिंगारे म्हणाले.

" मी चहा आणतो." सावंत म्हणाले. ते खाली गेले आणि त्यांनी सर्वांसाठी चहा आणला.

अल्फाने चहा पिता पिता त्या खोलीवर आपली शोधक नजर फिरविली. तशी दाटीवाटीचीच खोली होती ती. उजव्या बाजूला कपाट होते. मधोमध लिमयेंचा पलंग होता आणि डाव्या बाजूला खिडकी होती, ज्यातून सूर्याची किरणे खोलीत प्रवेशत होती. अल्फा खिडकीपाशी गेला. ती खिडकी रस्त्याच्या बाजूला होती आणि रस्त्यावरची सकाळची तुरळक रहदारी तेथून दिसत होती. खिडकीच्या बाजूलाच एक शिडी ठेवली होती आणि ती थेट खालच्या छोट्याशा, लिमयेंनी बनविलेल्या बगीचात उतरत होती. अल्फा पुन्हा मागे वळला, तेव्हा त्याच्या पायांना काहीतरी लागले. ते बुट होते. त्यांवर लालसर मातीची धूळ बसली होती. अल्फाने ते व्यवस्थित बाजूला ठेवले आणि तो पुन्हा खुर्चीपाशी आला.

"चला, श्री लिमये, आम्ही निघतो. " वाघमारे म्हणाले, " तुम्ही विश्रांती घ्या. आम्ही प्रयत्न करतोच आहे. काही हाती लागले, तर डॉ. शिंगारेंकरवी तुम्हाला कळवूच. तुम्ही स्वतःला जास्त त्रास करून घेऊ नका. "

लिमयेंनी हलकेच मान डोलावली. वाघमारे, अल्फा आणि मी खाली आलो. सावंत आम्हाला सोडायला दारापर्यंत आले.

" मला एक गोष्ट नाही समजली. " अल्फा सावंतांना म्हणाला, " श्री लिमये इतके आजारी असूनही त्यांना घरीच का ठेवले आहे? मला असं म्हणायचंय, की जर ते दवाखान्यात असते, तर अधिक चांगला इलाज होऊ शकला असता. "

" त्यांचा स्वतःचाच हट्ट! " सावंत म्हणाले, " संग्रहालयात ही दुर्घटना घडण्याआधीही श्री लिमये थोडे आजारी होतेच. घरी झोपूनच होते. त्यातच ही बातमी ऐकल्यानंतर त्यांची तब्येत आणखीनच खालावली. आम्ही म्हणतच होतो, की त्यांना हॉस्पिटलमध्ये ॲडमिट करायला हवे. पण त्यांनीच विरोध केला. जे काही उपचार करायचे असतील ते घरीच करा, असे ते म्हणाले. म्हणून डॉ. शिंगारेंनी लिमयेंना घरीच सलाईन्स, इंजेक्शन्स पुरविण्याची व्यवस्था केली. "

" ओह. अच्छा. " अल्फा म्हणाला, " ठिक आहे तर. आम्ही निघतो. काही हाती लागले, तर आम्ही तुम्हाला कळवूच. "

आम्ही घराच्या कुंपणाबाहेर आलो. अल्फाचे डोळे साशंक दिसत होते. त्याने आजुबाजुला नजर फिरविली. रस्त्याच्या कडेला, लिमयेंच्या कुंपणालगत लाल माती पसरली होती. अल्फाने क्षणभर तिकडे पाहिले. मग पुन्हा वळून श्री लिमयेंच्या खोलीच्या खिडकीकडे पाहिले. अचानक त्याच्या चेहऱ्यावरचा ताण जाऊन त्याठिकाणी एक वेगळाच तजेला दिसू लागला. वाघाला आपल्या सावजाचा सुगावा लागावा, तसे भाव त्याच्या डोळयांत तरळले.

"ते जरा अतीच होतं. " वाघमारे म्हणाले, " 'गुन्हेगाराची रुपरेषा आमच्यापाशी आहे' म्हणे! कसली डोंबलाची रुपरेषा..! त्यांचं फक्त समाधान करायचं होतं आपल्याला, खुष करायचं नव्हतं. बिचारे आता दिवसभर आपल्यासाठी डोळे लावून बसतील, कधी हे गुन्हेगाराला पकडतात म्हणून. तू ना अल्फा, नेहमीच काहीतरी गोंधळ करत असतोस. आता उद्यापर्यंत काही हाती लागलं नाही, तर मी काय उत्तर देऊ त्यांना?? "

अल्फाचे त्यांच्याकडे लक्षच नव्हते. तो अजुनही लिमयेंच्या खिडकीकडेच पहात होता.

" तू ऐकतोयस ना? " वाघमारेंनी विचारले, " हे बघ अल्फा. आपल्याकडे वेळ खुपच कमी आहे. उद्या याच सुमारास खंजीर चोरीला गेल्याची बातमी फुटण्याच्या मार्गावर असेल. आपल्याला झटपट हात हलवायला हवेत. मी हरतऱ्हेने शोध घेण्याचा प्रयत्न करतोय. पण यावेळी पोलीस डिपार्टमेंट माझ्या मागे नसल्यामुळे थोडे कष्ट पडताहेत. आजच्या दिवसात काहीतरी आपल्या हाती लागायलाच हवे आहे. आपण लिमये व सावंतांना आश्वासन दिले आहे. त्यांच्या विश्वासाला आपण पात्र ठरले पाहिजे. "

वाघमारेंच्या चेहऱ्यावर चांगलाच तणाव दिसत होता.

" आपण त्यांच्या विश्वासाला नक्कीच पात्र ठरणार आहोत. "अल्फा म्हणाला, " काही महत्त्वाच्या गोष्टी आमच्या हाती लागलेल्या आहेत, ज्या आम्ही तुम्हाला अजून सांगितलेल्या नाहीयेत. "

" काय सांगतोस? " वाघमारे जवळपास उडालेच, " कधी सांगणार आहेस मग? खंजिरचे पितळ उघडे पडल्यावर?? "

" संपूर्ण माहिती मिळाली, की लगेचच मी तुम्हाला सर्वकाही व्यवस्थित सांगतो. थोडा धीर धरा. आज कदाचित आम्हाला तुमची गरज पडू शकते. मी तुम्हाला फोन करेन आणि तेव्हाच सविस्तर सांगेन. "

" बरं बाबा. ठिक आहे. " वाघमारेंसमोर शांत बसण्याखेरीज पर्यायच नव्हता, " मी तुझ्या फोनची वाट पाहेन. "

इतके बोलून ते निघून गेले.

ते निघून जाताच अल्फा एकदम मला म्हणाला, " प्रभव, तू दोन मिनिटे इथेच थांब. मी जरा वरती जाऊन येतो. " तो मागे वळला.

" पुन्हा वरती? कशाला?? " मी काही न समजून म्हणालो. पण तितक्यात अल्फा दार उघडून वरती गेलासूद्धा! आणि गेला तसा मिनीटभरातच परतही आला.

" तुला मधुनच काय होते काही समजत नाही बाबा! " मी म्हणालो, " वरती का गेला होतास? "

" अरे, त्या तिघांचेही फोन नंबर घेऊन आलो - सावंत, शिंगारे आणि लिमये. शिवाय डॉ. शिंगारेंना काही विचारायचे होते. "

" काय विचारलेस? "

" श्री लिमये किती दिवसांपासून आजारी आहेत आणि त्यांच्यावर औषधपाणी किती दिवसांपासून चालू आहे, त्याची चौकशी केली. " अल्फा म्हणाला.

" पण त्याच्याशी आपल्याला काय कर्तव्य? असतील थोडे आजारी. तसेही साठीचे दिसतातच की. " मी बेफिकीरीने म्हणालो.

"अरे प्रभव, माझ्या भोळ्या मित्रा, आयोडीनचा वास फक्त डॉक्टर किंवा नर्सच्याच शरीराला यावा, असे काही बंधन नाही. तो रुग्णाच्या शरीरालाही येऊ शकतो..!!!" अल्फा चमचमत्या डोळयांनी माझ्याकडे पहात म्हणाला. मी 'आ' वासून त्याच्याकडे पाहतच राहिलो...

*

तो पूर्ण दिवस अल्फाची शोधमोहीम सुरूच राहिली. दिवसभर तो रुममध्ये नव्हताच. कुठेकुठेतरी भटकत होता. फक्त दुपारच्या जेवणावेळी तो मेसमध्ये मला भेटला. त्यावेळी तो डॉ. शिंगारेंकडे जाऊन आला होता. शिवाय श्री सावंतांनाही भेटला होता. आणखीही काही कामे शिल्लक आहेत, असे तो म्हणाला. मग पुन्हा गायब झाला. एक मात्र निश्चित होते - अल्फा या प्रकरणाच्या एका अनपेक्षित निष्कर्षाच्या मागावर होता..!!

संध्याकाळी पाचच्या सुमारास जेव्हा अल्फा परतला, तेव्हा माझ्या मॅथ्सच्या दोन एक्सरसाईजेस सोडवून झाल्या होत्या आणि एक मस्त झोपही काढून झाली होती.

"झाली का भटकंती? हवे होते ते मिळाले की नाही? " मी डोळे चोळत अल्फाला विचारले.

" मिळाले की नाही म्हणजे काय! चांगला सुपडासाफच करून टाकलाय मी आज या प्रकरणाचा! खंजिराचा चोर नक्की कोण आहे, याबाबत आता मी बिनधोकपणे बोलू शकतो. पण निघालेला निष्कर्ष धक्कादायक आहे, हे मान्यच करायला हवं. " अल्फा म्हणाला, " खुद्द चेअरमनसाहेबांनीच हा पराक्रम केलेला आहे!! "

" हं.. मला सकाळीच, जेव्हा तुझी नजर चेअरमनांच्या घरावरून साशंकतेने भिरभिरत होती, तेव्हाच वाटले होते, की या पठ्ठ्याला काहीतरी सापडले आहे, काहीतरी खटकले आहे. पण खरंच, हे सत्य मनाला सुन्न करणारे आहे. " मी म्हणालो.

" होय, वादच नाही. " अल्फा म्हणाला, " मी वाघमारे सरांना आत्ताच फोन करून सत्य परिस्थितीची अगदी सुरूवातीपासून माहिती दिली. बाकी कोणालाच मी काही बोललेलो नाहीये. कारण प्रत्येकाला मानसिक धक्के देण्याची माझी मुळीच इच्छा नाहीये. हे प्रकरण जितक्या गुप्तपणे संपेल, तितके चांगले आहे. आपल्यासाठीही आणि ही गोष्ट माहीत असणाऱ्यांसाठीही. "

" पण मला हे समजले नाही, की तुला त्या घरात असे काय दिसले, ज्यामुळे तुझे निशाण श्री लिमयेंवर रोखले गेले? कशावरून तू निष्कर्ष काढलास, की रत्नजडित खंजीर लिमयेंनीच चोरला आहे?? "

मी माझ्या मनात घर करून बसलेला सर्वाधिक कुतूहलाचा प्रश्न विचारला. अल्फा बोलू लागला,

" खरे तर हा निष्कर्ष खूप आधीच निघणे शक्य होते- जेव्हा मी चेअरमनसाहेबांच्या निकटवर्तीयांची माहिती काढत होतो तेव्हा. पण माझा निष्काळजीपणा आणि कमकुवत विचारक्षमतेमुळे आपल्याला इतका विलंब लागला. माझ्या तपासातून एक निकटवर्तीय सुटला होता - स्वतः चेअरमनसाहेबच!! त्यांचा स्वतःइतका निकटवर्तीय कोणीच असू शकणार नाही, हे माझ्या लक्षात यायला हवे होते. साहजिकच त्यांना स्वतःच्या केबिनची इतर कोणाहीपेक्षा अधिक चांगली माहिती असणार. पण श्री सावंतांनी, मंगळवारी रात्री जेव्हा आपण वाघमारे सरांसोबत संग्रहालयात गेलो होतो, तेव्हा सांगितले की, चेअरमनसाहेब आधीपासूनच आजारी आहेत आणि खंजीर चोरीला गेल्याची बातमी ऐकून त्यांची तब्येत आणखीनच बिघडली आहे. त्यामुळे माझ्या मनातून त्यांचा विचारच बाजूला पडला. गुन्हे संशोधनात आपल्या कानावर पडलेले वाक्य न् वाक्य आणि डोळयांनी पाहिलेले दृश्य न् दृश्य किती काळजीपूर्वक विचारात घ्यावे लागते, याची प्रचितीच मला यातून आली.

पण लिमयेंना आपण भेटायला गेलो, हे आपले सुदैवच म्हणावे लागेल! माझा निसटलेला धागा मला तेथेच मिळाला. लिमयेंच्या खोलीमध्ये शिरल्यानंतर त्यांच्याकडे पाहूनच माझे डोळे सतर्क झाले. उंच आणि सडपातळ देहयष्टी, बराच काळ बिछान्यावर पडल्यामुळे विस्कटलेले केस आणि आजारपणात रूग्ण घालतात तसे ढगळ कपडे.. अगदी अनिल पाटलाने वर्णन केले होते, तशीच व्यक्ती होती ती. त्यातच खोलीमध्ये आयोडीनचा वास भरून राहिला होता. त्यामुळे हळूहळू माझा संशय अधिकच बळावू लागला. मग मी इकडे तिकडे आणखी काही दिसते का, ते पाहू लागलो. मला खिडकीच्या बाजूला उभी असलेली शिडी दिसली. शिवाय खिडकीच्या खालीच रूममध्ये लिमयेंचे बूट दिसले. बूट हे कधीही दरवाजापाशी असतात, घरात प्रवेशल्यानंतर काढून ठेवायला. पण वरच्या मजल्यावरील बेडरूममध्ये बूट?? खटकण्यासारखीच गोष्ट होती ही थोडी. शिवाय त्या बूटांवर लालसर मातीची धूळ होती, जी मी खाली आल्यानंतर लिमयेंच्या घराच्या कुंपणाबाहेर पाहिली. याचा अर्थ सरळच होता. लिमये खिडकीतून खाली शिडीवरून उतरून त्या रात्री संग्रहालयात गेले असावेत आणि परतताना त्याच शिडीवरून आत आले असावेत.

आत येताना त्यांनी खोलीतच बूट काढून ठेवले आणि नंतर ते तसेच राहिले. याशिवाय आपल्यावर संशय येऊ नये, यासाठी गुन्ह्याच्या दोन दिवस आधीपासून आजारपणाचे आणि झोपून असल्याचे सोंग त्यांनी केले असणार. दवाखान्यात ॲडमिट होण्यास त्यांनी नकार का दिला? ॲडमिट झाल्यानंतर ते दवाखान्यात सर्वांच्या देखरेखीखाली राहिले असते आणि त्यांना तेथून सर्वांची नजर चुकवून जाणे शक्य झाले नसते.

आणखी एक प्रश्न होता. लिमये खिडकीतून का उतरले? दारातून का बाहेर पडले नाहीत? डॉ. शिंगारेंना भेटल्यानंतर मला याचे उत्तर मिळाले. डॉ. शिंगारेंनी मला सांगितले, की मंगळवारी रात्री साडेनऊ वाजता, जेवणानंतर लिमयेंना औषधे आणि इंजेक्शन देण्यासाठी ते त्यांच्या घरी गेले होते. तेव्हा लिमये त्यांना म्हणाले, की आता मला उठवत नाहीये. त्यामुळे मी तुम्हाला निरोप देण्यासाठी खालपर्यंत येऊ शकत नाही. तेव्हा तुम्ही एक काम करा. माझ्या घराला बाहेरून कुलूप लावून जा. दार आतून लावून घेण्यासाठी खाली उतरण्याइतकी माझ्यात शक्ती नाही.

लिमयेंच्या सांगण्याप्रमाणे शिंगारेंनी बाहेरून कुलूप घातले आणि ते त्यांच्या दवाखान्यात एका महत्त्वाच्या ऑपरेशनसाठी निघून गेले. गुन्हा घडण्याच्या वेळी आपण घरीच होतो आणि आपल्याला बाहेर पडणे शक्यच नव्हते, हे दाखविण्यासाठी लिमयेंचा असा सारा खटाटोप. पण इतके करूनसुद्धा शेवटी आपण त्यांना ओळखलेच! गुन्हेगार काही गोष्टींकडे निरुपद्रवी म्हणून दुर्लक्ष करतो आणि त्याच गोष्टी त्याला पकडून देण्यात अतिशय मोठी कामगिरी बजावतात. या प्रकरणातील याचे उदाहरण म्हणजे लिमयेंच्या बेडरूममधले बूट! असो. त्यांनी खंजीर कुठे लपविलाय, याबाबत त्यांनी माहिती सांगणे जास्त आवश्यक आहे. माझ्या तर्कानुसार तो त्यांच्या बेडरूमशिवाय आणखी कोठेही नसेल.. "

" वॉऽऽव!! भन्नाट!! अगदी काही तासांतच तू खंजिराच्या चोराला शोधून काढलेयस अल्फा! " मी तर थक्कच झालो होतो, " आज दिवसभर कुठे कुठे गेला होतास तू? आणि काय काय केलंस? "

" जेवणाआधी अर्थातच मी शिंगारेंना भेटलो आणि त्यांच्याकडून लिमयेंच्या आजारपणाबाबत इत्यंभूत माहिती मिळविली. दुपारी जेवण झाल्यावर मी लिमयेंकडे गेलो. त्यांना विचारले, की मला तुमच्याशी एकांतात काही अत्यंत महत्त्वाचे बोलायचे आहे आणि मी तुम्हाला भेटायला कधी येऊ? त्यांनी आज रात्री साडेआठ वाजता बोलावले आहे. मग वाघमारे सरांकडे गेलो. त्यांना सगळा वृत्तांत कथन केला. माझी अनिल पाटलापासून ते लिमयेंपर्यंतची शोधकथा ऐकून ते हडबडूनच गेले होते. त्यांनी मला लिमयेंच्या घराखाली सव्वाआठपर्यंत येण्याचे आश्वासन दिले आहे. आपण तिघे सोडून इतर कोणालाच ही गोष्ट ठाऊक नाहीये. चार दिवसांच्या अथक, धकाधकीच्या शोधाचा अंत आज होईल, असा मला विश्वास वाटतो.. "

" नक्कीच होईल. तू खरंच एक जिनीयस आहेस अल्फा!! " मी म्हणालो. अल्फा हसला.

" चल, चल. असे डायलॉग मारून इमोशनल करू नकोस. पुस्तक घे आणि अभ्यास कर आता. संध्याकाळी जायचंय आपल्याला. " असे बोलून अल्फाने चर्चा थांबविली. आता फक्त घड्याळ साडेआठ वाजल्याचे कधी दाखविते, याचीच उत्सुकता होती..!!!

***

# 9.

त्या रात्री आठच्या सुमारास मी आणि अल्फा रूमवरून बाहेर पडलो आणि पंधरा मिनिटांतच श्री लिमयेंच्या घरापाशी पोहोचलो. आमच्या मागोमाग मिनीटभरातच वाघमारे सरही आले. त्यांच्या चेहऱ्यावर थोडे गोंधळल्याचे आणि तणावाचे भाव दिसत होते.

"अल्फा, तुला पूर्णपणे खात्री आहे ना रे बाबा, की या सगळ्या प्रकरणामागे लिमयेसाहेबांचाच हात आहे? " गाडीवरून उतरतच त्यांनी विचारले.

" होय सर. मला खात्री आहे. मी दुपारीच माझी तर्कसंगती तुम्हाला स्पष्ट केलेली आहे. त्यानुसार परिस्थिती केवळ श्री लिमयेंकडेच बोट दाखविते. " अल्फा म्हणाला.

" ठिक आहे. तार्किकदृष्ट्या तुझा निष्कर्ष अगदी योग्य वाटतो म्हणा. पण हे थोडे धाडसाचे पाऊल वाटते. लिमयेसाहेब हे शहरातील एक बडे प्रस्थ आहे. त्यांचे आणि माझे बऱ्याच वर्षांपासूनचे घनिष्ठ संबंध आहेत. ते असे कृत्य का म्हणून करतील? "

" ते आता वरती गेल्यानंतर काही वेळात स्पष्ट होईलच. साडेआठ वाजले आहेत. आपण आतमध्ये जायला हरकत नाही. "अल्फा म्हणाला.

" बरं. चला. " वाघमारे म्हणाले, " तुझे लिमयेंवरचे आरोप सिद्ध झाले म्हणजे मिळवली. नाहीतर मी गोत्यात येईन!! "

" काळजी करू नका. लिमये स्वतःहून आपल्याकडे खंजीर सुपूर्द करतील. "

दार उघडून आम्ही आत शिरलो. लाकडी पायऱ्या चढून आम्ही लिमयेंच्या रूमपाशी गेलो. वाघमारे सरांनी दरवाजा ठोठावला.

" या आतमध्ये. दरवाजा उघडाच आहे. "आतून क्षीण आवाज आला. आम्ही तिघेही दार उघडून आत शिरलो. आतमध्ये लिमये आपल्या बेडवर पहुडले होते. वाघमारेंना पाहून त्यांना थोडे आश्चर्यच वाटले.

" ये अल्फा. वाघमारे साहेब, तुमचे कसे काय येणे झाले? अल्फा म्हणाला होता, की तो एकटाच येईल. " खोल आवाजात लिमये म्हणाले.

" एक अतिमहत्त्वाचे काम तमाम करायचे आहे आम्हाला. त्यासाठी वाघमारे सरांचे इथे असणे मला आवश्यक वाटले. म्हणून मीच त्यांना बोलावलेय. " अल्फा म्हणाला.

" ओह.. अच्छा.. कसले काम? " लिमयेंनी विचारले.

" रत्नजडित खंजीर मिळविण्याचे. " अल्फा म्हणाला. लिमये सावध झाले. पण आपल्या मनातली भीती न दर्शविता ते म्हणाले,

"तुमचे काम आणि खंजीर शोधण्याची धडपड यांचा मी आदर करतो, वाघमारेसाहेब. तुम्ही कोणालाही थांगपत्ता लागू न देता तपासात इतकी प्रगती केली आहे, ही वाखाणण्याजोगी गोष्ट आहे. उद्या संग्रहालयाची तपासणी आहे. उद्यापर्यंत जर खंजीर मिळाला नाही, तर मी आणि आमची कमिटी, सर्वच बरबाद होऊ.. त्यामुळे माझी तुम्हाला कळकळीची विनंती आहे, की आजच्या रात्रीत या प्रकरणाचा सोक्षमोक्ष लावून टाका.. गुन्हेगाराला चांगली अद्दल घडू दे..! "

" नक्कीच, श्री लिमये. काही वेळातच आम्ही या प्रकरणाचा सोक्षमोक्ष लावणार आहोत." अल्फा म्हणाला.

"तुमच्या हाती लागलेय तरी काय? मला कळू द्या ना. कोण गुन्हेगार असेल, असे तुम्हाला वाटते? मला भेटल्यानंतर तुम्ही कोणाकडे जाणार आहात?? " त्यांनी चौकस डोळ्यांनी अल्फाकडे पहात विचारले. पण त्यांच्या चेहर्‌यावरून स्पष्ट दिसत होते, की त्यांना या प्रश्नांची उत्तरे ऐकण्यात मुळीच स्वारस्य नव्हते.

" कोठेही जाण्याची आवश्यकता नाहीये, लिमयेसाहेब!! आज, आत्ता याच खोलीत आपण सगळया गोष्टी स्पष्ट करणार आहोत. " अल्फा धारदारपणे म्हणाला. मघापासून लिमयेंनी दाबून ठेवलेली भीती क्षणात त्यांच्या चेहऱ्यावरती पसरली.

" म्.. म्हणजे?? मी... मी... नाही.. समजलो... " थरथरत्या आवाजात लिमये बोलले.

"तुम्ही अभिनय उत्कृष्ट करता, लिमयेसाहेब. तुम्हाला तर अभिनेता असायला हवे होते!! अल्फा म्हणाला, " पण अभिनय हा शेवटी एक मुखवटाच असतो, प्रेक्षकांसमोर घालण्याचा. त्यामागचा चेहरा वेगळाच असतो. आणि तो चेहरा सर्वांसमोर येण्यास फार वेळ लागत नाही.."

"तुला म्हणायचं तरी काय आहे अल्फा?? खंजीर मी चोरलाय अशी शंका तरी कशी येऊ शकते तुम्हाला?? " लिमये संतापून म्हणाले. मघाच्या क्षीण आवाजाची जागा आता खणखणीत आवाजाने घेतली होती. पण त्या आवाजातली भीती मात्र लिमयेंना लपविता आली नाही.

" शंका नव्हे, आम्हाला पुरेपूर खात्रीच आहे, श्री लिमये. या गुन्ह्यामागे तुमचाच हात आहे!! हा आरोप तुम्हाला जितका अनपेक्षित होता, तितकाच आज सकाळपर्यंत आम्हालाही होता- आम्ही तुम्हाला भेटण्याच्या आधीपर्यंत. पण हेच सत्य आहे आणि आम्ही ते सिद्धही करू शकतो. वाघमारे सर, आपण या खोलीची झडती घेऊया. आपल्याला खंजीर मिळाला, की आपोआपच सगळे साफ होईल. यांना आणखी काही समजाविण्याची गरजच राहणार नाही. "

" ठिक आहे. " वाघमारे सर उठलेच होते, पण तितक्यातच लिमये अचानक बिछान्यातून उठले आणि त्यांनी खिडकीकडे झेप घेतली. मला त्यांची ही कृती अतिशय अनपेक्षित होती. पण अल्फाने चपळाईने धावून त्यांचा हात पकडला आणि त्यांना मागे ओढून पुन्हा पलंगाकडे भिरकावले.

" तुम्ही पळून जात असाल, तर मी तुम्हाला सांगू इच्छितो, की मी वरती येण्याआधी खिडकीलगतची शिडी काढून ठेवलेली आहे. आणि जर आत्महत्या वगैरे करणार असाल, तर तुम्ही खंजीर कुठे लपविलाय, हे सांगितल्याखेरीज आम्ही तुम्हाला तसे करूच देणार नाही. " अल्फा म्हणाला.

" खंजीर कुठे लपविलाय, ते बऱ्या बोलाने सांगा, श्री लिमये. तुमची झडती घ्यावी, अशी माझी मुळीच इच्छा नाहीये. पण तुम्ही बोलला नाहीत, तर माझा नाईलाज होईल. " वाघमारे म्हणाले.

" मी.. मी.. ना.. नाही... तुम्ही.. सिद्ध... क्.. करा... " लिमये असंबद्ध बडबडले. त्यांच्या अंगाला घाम सुटला होता आणि त्यांची स्थिती दयनीय झाली होती.

" हरकत नाही. वाघमारे सर, मी यांना घटनाक्रम व्यवस्थित समजावून सांगतो, म्हणजे यांचे समाधान होईल. आपल्याला काही गडबड नाही. " अल्फा म्हणाला. मग तो लिमयेंना म्हणाला, " तुमचे डोके थोडे थंड करा आधी. आणि कोणतीही चालाखी करण्याचा प्रयत्न तुम्हाला चांगलाच महागात पडेल, हे ध्यानात ठेवा. "

लिमये अजुनही घाबरून खाली पहात होते. वरती नजर करण्याची त्यांची हिंमतच झाली नाही. अल्फाने बोलण्यास सुरूवात केली,

" तुमच्या डोक्यात रत्नजडित खंजिराबद्दल हाव कधी निर्माण झाली आणि तुम्ही तो चोरण्याचा दुष्ट डाव कधी रचला, हे काही मी सांगू शकत नाही. पण तुम्ही तो डाव अंमलात आणण्याची सुरुवात मात्र गुन्हा घडण्याच्या दोन दिवस आधीपासूनच केली होती.

तुम्ही आजारी पडल्याचे सोंग केले. तुमची घरीच सलाईन आणि औषधपाणी करून घेण्याची कृतीच थोडी संशयास्पद होती; पण माझ्या ती उशीरा लक्षात आली. गुन्हा घडण्याच्या रात्री तुम्ही डॉ. शिंगारेंना घराला बाहेरून कुलूप घालून जाण्यास सांगितले. हे सर्व केल्यामुळे संशयाचा रोख तुमच्यापासून दूर हटला गेला. मग डॉ. शिंगारे निघून गेल्यानंतर तुम्ही आधीच खिडकीपाशी उभ्या केलेल्या शिडीवरून खाली उतरला. कोणाच्याही नजरेस पडणार नाही, याची मोठ्या शिताफीने काळजी घेत तुम्ही राजवाड्यामागील संग्रहालयाच्या मागील गेटपाशी आला. योगायोगाने तेथे रखवालदार उपस्थित नव्हता. त्यामुळे तुमचे आणखीनच फावले. तुम्ही गेटवरून चढून खिडकीतून आत शिरला. मौल्यवान वस्तू ज्या दालनात ठेवल्या आहेत, त्या दालनात आला. पण तेथे तुम्ही नक्कीच एक अनपेक्षित दृश्य पाहिले असणार - खंजिराच्या पेटीच्या बाजूला रक्ताच्या थारोळयात पडलेला रखवालदाराचा मृतदेह!! "

लिमयेंनी एकदम झटका बसल्यासारखे अल्फाकडे पाहिले.

"तुला... तुला हे कसे ठाऊक.. की तो आधीच मेला होता..?? " त्यांनी विचारले.

" मी घडलेल्या गुन्ह्याची खडान् खडा माहिती काढून इथपर्यंत आलोय, श्री लिमये. " अल्फा म्हणाला, " ते दृश्य पाहून तुम्ही थोडे गडबडून गेला असाल, घाबरला असाल. तो खुन तुमच्यासाठी नक्कीच धोकादायक होता, कारण त्यावेळी तुम्हाला कोणीही तेथे पाहिले असते, तर त्या खुनाचा आळ तुमच्यावर आला असता. त्यामुळे जराही विलंब न करता तुम्ही तुमच्या केबिनमध्ये शिरला. कपाट उघडून त्यातील चाव्यांचा जुडगा उचलला, पेटीतून खंजीर काढून चाव्या तशाच सोडून तुम्ही घरी पोहोचलासुद्धा!! कोणालाही कसली चाहूल नाही, कोणताही पुरावासुद्धा नाही. तसे पहायला गेले, तर तुमचा बेत सफल झाला होता. कोणाच्याही नकळत तुम्ही खंजीर हस्तगत केला होता.

पण भिंतीलाही कान असतात, श्री लिमये. दैव हे असे असते, की ते आपल्या मनाविरुद्ध कधीच घडू देत नाही. तुम्ही जरी अत्यंत कौशल्याने खंजीर चोरलेला असला,

तरीही तुम्हाला तो लाभावा, हे दैवाच्या मनातच नव्हते. एक गोष्ट अशी होती, की जिच्यापासून तुम्ही अनभिज्ञ होता आणि आजही आहात. तीच गोष्ट या प्रकरणाला कलाटणी देणारी ठरली. ती गोष्ट म्हणजे गुन्हा घडण्याच्या वेळी संग्रहालयात तुमच्या आणि मृत रखवालदार महादबा पाटलाच्या प्रेताखेरीज असलेली तिसऱ्या व्यक्तीची उपस्थिती!! त्या वेळी फक्त तुम्ही एकटेच गुन्हेगार नव्हता, लिमयेसाहेब. तुमच्यासोबत आणखीही एक गुन्हेगार तेथे लपून बसला होता आणि तोच तुम्ही केलेल्या गुन्ह्याचा साक्षीदार ठरला. "

" क्.. काय?? त्यावेळी.. तेथे... आणखीही कोणी होते...?? पण.. क.. कोण..?? " लिमयेंनी अपादमस्तक थरथरत विचारले.

" तेथे रक्ताच्या थारोळ्यात पडलेल्या रखवालदाराचा खुनी! " अल्फा म्हणाला, " तुमच्याआधी काही मिनिटेच तो तेथे आला होता. त्याने रखवालदाराला ठार केले आणि तितक्यातच त्याला तुमची चाहूल लागली. तो लगबगीने तुमच्याच केबिनमध्ये लपला. पण तुम्ही लवकरात लवकर खंजीर घेऊन तेथून निसटण्याच्या बेतात असल्यामुळे तुम्हाला तो दिसला नाही. पण त्याने मात्र पाहिले - खिडकीतून येणाऱ्या चंद्रप्रकाशामुळे पडलेल्या तुमच्या सावलीला पाहिले!! आणि त्याने केलेल्या त्या सावलीच्या वर्णनात आणि तुमच्या देहयष्टीत काडीचाही फरक नाहीये!!

याशिवाय खिडकीलगतची शिडी आणि तुमच्याच बेडरूममध्ये खिडकीखाली पडलेले बूटही हेच सांगून गेले, की तुम्ही आलिकडेच कधीतरी खिडकीतून खाली उतरलेला आहात. या सर्व गोष्टींवरून हे स्पष्टच होते, की खंजिराचे चोर तुम्हीच आहात आणि ज्याअर्थी तुमच्या या 'आजारपणा'मुळे तुम्ही घरातून बाहेर पडला नाही, त्याअर्थी खंजीर घरातच कोठेतरी असला पाहिजे, जो आम्ही काही वेळ झाडाझडती केल्यानंतर मिळेलच. आता त्या रखवालदाराच्या खुन्याच्या नावाखेरीज तुम्हाला काहीही विचारायचे असेल, ते विचारा. तुमच्या शंकांचे आम्ही निरसन करू..! "

अल्फाचे स्पष्टीकरण ऐकून लिमयेंचे हातपाय गळाले. ते जवळपास रडकुंडीलाच आले त्यांनी दोन्ही हातांनी आपला चेहरा झाकून घेतला.

" माझी चूक झाली... भयानक चूक..!! लोभाला बळी पडून मी हे काय करून बसलो!!! माझ्या दिर्घ कारकिर्दीत मला कधी त्या खंजिराची हाव वाटली नव्हती ; पण आता... निवृत्त होण्याच्या वेळी... "

" तुम्ही उर्वरित आयुष्य ऐषआरामात घालविण्याचा विचार केला असणार, हो ना? " वाघमारेंनी विचारले, " मला तुमच्याबद्दल खुप आदर होता, लिमयेसाहेब! पण तुम्ही असे कृत्य कराल, असे कधी वाटले नव्हते. तुमच्या या कृतीची मला घृणा वाटते. "

" मला माफ करा, वाघमारे साहेब.. माझी चूक झाली. मला आता माझ्या लोभी मनाची भयंकर चीड येते आहे.. तुम्ही द्याल ती शिक्षा भोगण्यास मी तयार आहे.. " गयावया करीत लिमये बोलले.

" पहिली गोष्ट म्हणजे तो खंजीर तुम्ही ताबडतोब आमच्या हवाली करा आणि दुसरी गोष्ट म्हणजे, तुम्ही तुमच्या पदाचा राजीनामा द्या आणि हे शहर सोडून दूर कोठेतरी निघून जा. हे प्रकरण बाहेरच्या लोकांपर्यंत पोहोचणार नाही, याची पुरेपूर काळजी आम्ही घेतोच आहे, पण भविष्यात कधी कोणाला याबद्दल कळाले, तर तुम्हाला मान खाली घालावी लागेल आणि त्याचा तुम्हालाच मनस्ताप होईल. श्री सावंतांना आम्ही वचन दिले आहे. या प्रकरणाचा तपास जितक्या गुप्तपणे सुरू झाला होता, तितक्याच गुप्तपणे संपवायचादेखील आहे. त्यामुळे खंजिराचा चोर कोण होता, ही गोष्ट आपल्या चौघांमध्येच राहिल, याची खात्री मी देतो. "

अल्फाने आश्वासन दिले. लिमयेंच्या डोळयांत पाणी तरळले. त्यांच्या कृत्याचा त्यांना पश्चात्ताप होत होता.

" धन्यवाद..! धन्यवाद अल्फा..!! तुम्हा सर्वांच्या मनाचा किती मोठेपणा!! किती आभार मानू मी तुमचे... मी तुम्हाला आश्वासन देतो. आज रात्रीच मी कोकणात जाईन.. तेथे माझी थोडी जमीन आणि छोटे घर आहे. तेथे कष्ट करून उदरनिर्वाह करेन..

आणि इथून पुढे कधीही सांगली शहरात येणार नाही! मला या कटू आठवणींपासून सुटका करून घ्यायची आहे... "

मग लिमये उठले आणि त्यांनी पलंगाची गादी वरती केली. तेथे एक सहज न दिसणारा ड्रॉवर होता. तो त्यांनी सरकविला आणि त्यामधून एक वस्तू बाहेर काढली - रत्नजडित खंजीर!!!

त्या खंजिराच्या तेजाने आम्हा तिघांचेही डोळे दिपून गेले. त्याच्या मुठीवर पुरातन काळातील अत्यंत मौल्यवान अशी चार माणके आणि तीन हिरे चमचमत होते. अतिशय सुंदर आणि किंमती वस्तू होती ती!! लिमयेंनी तो खंजीर अल्फाच्या हातात कोंबला.

"घेऊन जा.. घेऊन जा ती दूषित वस्तू!! माझ्या डोळ्यासमोरही नकोय तो खंजीर!! " लिमये अल्फापासून दूर सरकत म्हणाले.

" धन्यवाद, श्री लिमये. " अल्फा म्हणाला, " तुम्हाला तुमच्या दुष्कृत्याचा पश्चात्ताप झाला, हीच आमच्यासाठी समाधानाची बाब आहे. आता स्वतःला दोष न देता नवीन आयुष्य सुरू करा. घडलेल्या गोष्टी विसरून जा. माणूस चूका कधी आपणहून करीत नसतो. त्या त्याच्या हातून वाईट प्रवृत्ती करवून घेत असतात. मग कधी तो लोभ असेल, कधी संताप असेल, तर कधी मत्सर!! पण त्या प्रवृत्तींना मारून टाकणे आणि झालेल्या चुकांची पुनरावृत्ती न करणे ही मात्र आपली जबाबदारी असते. तेवढी काळजी घ्या. प्रत्येक माणसात एक चांगले मन दडलेले असते. लोभ काय, संताप काय किंवा मत्सर काय, तिनही मानवी मनासाठी वाईटच. ते आपल्या चांगल्या मनावर ताबा मिळवणार नाहीत, याची खबरदारी आपणच घ्यायला हवी. ठिकाय तर, आम्हाला हवी असलेली वस्तू आम्हाला मिळाली आहे. वाघमारे सर, आपण निघूया का आता? श्री सावंतांच्या तडफडणाऱ्या जीवाला एकदाची शांती दिलेली बरी. "

" हो. चला. " वाघमारे सर म्हणाले, " येतो लिमयेसाहेब. आता पुन्हा आपण भेटणार नाही, अशी अपेक्षा करतो. "

आम्ही दरवाजाकडे वळलोच होतो, तितक्यात लिमये म्हणाले,

" वाघमारे, तुम्हाला एक गोष्ट सांगायची आहे. तुमचा हा तरूण साथीदार आणि अनुयायी खुपच तल्लख आहे. त्याची बुद्धी आणि विचारशक्ती अचंबित करणारी आहे. तुला माझा सलाम आहे अल्फा! माझ्यासारख्या वाटेवरून भटकलेल्यांना अद्दल घडविण्याचे काम असेच तू यशस्वीपणे करत राहशील, अशी माझी अपेक्षा आहे."

"तुमच्या अपेक्षेला मी नक्कीच खरे उतरेन, श्री लिमये. " अल्फा म्हणाला, " चला. निघतो आम्ही. "

आम्ही खाली उतरून घराबाहेर पडलो आणि रस्त्यावर आलो. मी आणि अल्फाने वाघमारेंकडे पाहिले. ते काय प्रतिक्रिया देतात, याची आम्हाला जाम उत्सुकता होती. त्यांनी अल्फाकडे पाहिले आणि थोडे हसले.

" ठिक आहे, ठिक आहे. यावेळीही तूच केस सोडविलीस. " ते म्हणाले, " काही हरकत नाही. थोडा ट्विस्ट होता केसमध्ये, जो माझ्या लक्षात आला नाही. तरीही.. खरं.. पण.. "

त्यांना काहीतरी बोलायचे होते, पण बोलवत नव्हते. अखेर त्यांनी कबूल केलेच, " उत्तम रहस्यभेद होता हा.. "

" आभार, सर. " अल्फा गालातल्या गालात हसत म्हणाला.

" पण याचा अर्थ असा नाही, की मी मठ्ठ आहे. माझ्या नजरेतून काही गोष्टी अनावधानाने सुटतात आणि त्या तुला दिसतात. पण.. जाऊदे. खंजीर मिळाला, हे महत्त्वाचे, मग तो कोणी का शोधेना. "

" शेवटी मी तुमचाच चेला आहे, सर. तुमच्याबरोबर काम केलं, तुमच्याच पावलांवर पाऊल ठेवत गेलो आणि यशस्वी झालो. ही तर फक्त सुरूवात आहे. यापुढेही मला

अनेक रहस्ये उलगडायची आहेत आणि तेव्हा वेळोवेळी तुम्ही केलेल्या मार्गदर्शनाचा मला फायदा होईल, असा मला विश्वास वाटतो.." अल्फा नम्रपणे म्हणाला.

"बरं बरं. " वाघमारेंच्या आवाजात जरा कणखरपणा आला, " आता एक शेवटचं काम कर. सावंतांना संग्रहालयात बोलावून घे आणि खंजीर त्यांच्या हवाली करून टाक. बिचारे शांतपणे झोप तरी घेऊ शकतील आज. "

" ठिक आहे सर. "अल्फा म्हणाला आणि त्याने लगेच सावंतांना फोन लावला.

" हॅलो.. श्री सावंत, अल्फा बोलतोय... आत्ताच्या आत्ता संग्रहालयात या.. मी तिकडे खंजीर घेऊन येतोय.. होय, खंजीर मी मिळविलाय.. होय, मी खरेच बोलतोय... अहो थट्टा करण्याची गोष्ट आहे का ही?? मी खंजीर घेऊन येतोय... तेवढे फक्त विचारू नका, इतकी कृपा करा.. मी कोणालातरी वचन दिलेले आहे. त्यामुळे कसा शोधला, कुणाकडे होता या प्रश्नांची उत्तरे मी मुळीच देणार नाही. फक्त तुम्ही तो माझ्याकडून घ्या आणि होता त्या जागी ठेवून टाका, बस्स!! ... असू दे, असू दे. धन्यवादांची गरज नाही.. अहो उपकार कसले.. काहीतरीच काय... बरं ठेवतो. तुम्ही लगेच या. "

अल्फा हसायला लागला.

" मला तर प्रथम वाटलं, की अत्यानंदाने बेशुद्ध होतायत की काय हे!! "

" ही घे माझ्या गाडीची किल्ली. लगेच जाऊन ये संग्रहालयात. आणि ट्रॅफिक पोलिसाला सापडू नकोस. तुझ्याकडे परवाना नाहीये. माझी पंचाईत करशील!! आम्ही वाट पाहतोय इथेच. "

वाघमारेंनी गाडीची किल्ली अल्फाच्या हवाली केली. अल्फाने खंजीर खिशात खोलवर सुरक्षित ठेवला आणि तो निघून गेला. वाघमारे सर त्याच्याकडे पहातच राहिले.

" पोरात टॅलेंट आहे, हे नाकबूल करताच येणार नाही. " ते म्हणाले, " तू त्याचा नवीनच रूममेट ना? "

" होय. " मी उत्तरलो.

" काय मग? कसा वाटला तुला हा तुझा 'रूम पार्टनर'? "

" थोडासा वेडपट, बडबड्या, पण भन्नाट!! " मी प्रतिक्रिया दिली. मग अचानक मला आठवले, " सर, तुम्हाला एक गोष्ट विचारायची होती. तुम्ही अल्फाला कधीपासून ओळखता? "

" त्याच्या जन्मापासून. " वाघमारे सर म्हणाले, " का रे? "

" मला दोन गोष्टींबद्दल अजून नीटसे समजलेले नाहीये. एक म्हणजे अल्फाचे आई - वडील कोठे असतात आणि काय करतात? आणि दुसरी म्हणजे तो मुळचा कुठला आहे? त्याने स्वतःबद्दल काहीच सांगितलेले नाहीये. दरवेळी तो हा विषय टाळतो. "

" खरे तर अल्फा हा मुळचा इथलाच आहे, सांगलीचा. " वाघमारे म्हणाले.

" काय?? " मला विचित्रच वाटले, " असे कसे असू शकते? जर तो सांगलीचाच आहे, तर तर माझ्यासोबत रूमवर कसा राहतो? आणि त्याचे आई - बाबा कोठे असतात? "

" त्याने तुला स्वतःबद्दल अगदीच अंधारात ठेवलेले दिसतेय. " वाघमारे म्हणाले, " अल्फाचे आईवडील आता या जगात नाहीयेत. त्याचा जन्म झाल्यानंतर काही महिन्यांतच अपघातात त्यांचा मृत्यू झाला. त्यानंतर कोणीतरी अल्फाला अनाथाश्रमात सोडले. त्याचे नातेवाईक आहेत की नाहीत, ते कोठे आहेत, काय करतात याबद्दल कोणालाच काहीच कल्पना नाही. पंधरा - वीस वर्षांपूर्वी, जेव्हा मी पोलीसखात्यात नवीनच होतो, तेव्हा इथे श्री प्रधान पोलीस अधीक्षक होते. खुपच कर्तृत्ववान माणूस. माझे गुरू. ते त्या अनाथाश्रमाचे देणगीदार होते. त्यांनी तिथे अल्फाला हेरले. त्याची कुशल बुद्धीमत्ता आणि संशोधनातील आवड ताडून त्यांनी त्याला हळूहळू आपल्या कामात समाविष्ट करून घ्यायला सुरुवात केली. तेव्हा माझा अल्फाशी परिचय झाला. आता प्रधान सर निवृत्त झाले आहेत.

पण अल्फा अजूनही आम्हाला मदत करतच असतो. खरे तर मला माझ्या कामात कोणी लुडबुड केलेली पसंत नाही. पण प्रधान सर म्हणतात, की पोरगा हुशार आहे. त्याला आवडतंय तर करू दे मदत. म्हणून मी त्याला काही केसेसमध्ये शोध घेण्याची परवानगी देत असतो. तो अनाथाश्रम अठरा वर्षांपुढील मुलांना ठेवून घेत नाही. म्हणून प्रधान सरांनीच त्याच्या रहाण्या-जेवणाची सोय करून दिली आहे. तो पोरगा म्हणजे माझ्यासाठी एक कटकट आहे खरी. पण त्याचे भविष्य उज्ज्वल आहे. तो पुढे जाऊन मोठे नाव कमविणार, यात शंकाच नाही. ".

मला अल्फाच्या उत्साही चेहऱ्यामागचे सत्य जाणून दुःख झाले आणि त्याहीपेक्षा जास्त त्याचा आदर वाटला. मला एक चतुर, चपळ आणि अतिशय बुद्धिमान असा डिटेक्टिव्ह सोबतीला मिळाला होता. रत्नजडित खंजिराचे प्रकरण म्हणजे माझ्या आयुष्यातील एक न विसरता येण्यासारखा अनुभव होता. यासारख्या आणखी किती 'आडमार्गां' वरून अल्फा मला नेणार होता, कोण जाणे!! प्रत्येक मार्ग रहस्यमय, धोकादायक, पण आयुष्याचा अर्थ सांगून जाणारा असणार होता. वाघमारे सरांसोबत तेथे उभा असताना - 'घनिष्ठ मैत्री किंवा नवीन रूम' यांच्यातला एक पर्याय मी निवडून टाकला...!!!

***

धन्यवाद

माझं हे पहिलंच पुस्तक शेवटपर्यंत वाचलंत ना तुम्ही!

काय मग? कशी वाटली कथा? मला खात्री आहे, की डिटेक्टिव्ह अल्फासोबत तुम्हीही रत्नजडित खंजिराचा पाठलाग करण्याचे थ्रील अनुभवले असेल. जर तुम्हाला ही कथा आवडली असेल, तर मला नक्की कळवा. माझा फोन नं. 8983234042. तुम्ही मला व्हॉट्सअॅपवर भेटू शकता, फेसबुकवर शोधू शकता किंवा मला sourabhwagale@yahoo.com वर मेलदेखील करू शकता. मी आपला मित्र अल्फाच्या आणखी नवीन नवीन करामती लिहीण्याचा नक्की प्रयत्न करेन. फक्त तुमचा feedback द्यायला मात्र विसरू नका.

लवकरच भेट होईल, अशी अपेक्षा.

**-सौरभ वागळे**

सौरभ वागळे हे ई साहित्यचे नवीन दमाचा लेखक. सांगलीच्या वालचंद कॉलेज ऑफ इंजिनिअरिंगमध्ये  B.Tech. Mechanical stream मध्ये सध्या शिकत आहे. त्याच्या पुस्तकाबद्दल आपलं प्रांजळ स्पष्ट मत आपण कळवावं ही विनंती.

**-प्रकाशक**

# ई साहित्य प्रतिष्ठान

मित्रहो , सहजासहजी फ़ुकट काहीच मिळत नाही. न आरोग्य न धन न संपदा. काहीही मिळवायचं तर संघर्ष आणि श्रम करावेच लागतात. “गोलमाल” करून, मेकओव्हर सर्व काही मिळवता येतं असा गैरसमज माध्यमांद्वारे सर्वत्र पसरवला जात आहे. झटपट श्रीमंती, आठ दिवसांत गोरेपणा, महिन्याभरात लांबसडक केस, एक हनुमान यंत्र गळयात बाधले की आजारांपासून मुक्ती अशा जाहिराती माथी मारल्या जात आहेत. अशा वेळी पुस्तकं वाचून माणूस “जमिनीवर” येतो. फ़ुकट काहीच मिळत नसतं. प्रत्येक गोष्टीसाठी कुणाला न कुणाला कष्ट पडतात. कधी आपल्याला, कधी आपल्या आईवडलांना, गुरूंना, तर कधी समाजातील इतरांना.

ई साहित्य प्रतिष्ठानची पुस्तकं विनामूल्य मिळतात. पण ती लिहिण्यासाठी लेखकांचे कष्ट व बुद्धी लागलेले असतात. आणि या एकेका पुस्तकाची किंमत म्हणुन लेखक हजारो लाखो रुपये मिळवू शकतात. पण मराठी वाचकांना  विनामूल्य पुस्तकं मिळावी, व मराठीत वाचन संस्कृती वाढावी म्हणून असंख्य लोक प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नांत ई साहित्य प्रतिष्ठान व हे सर्व लेखक सहभागी आहेत. आपण या अभियानात सहभागी झालात का?

आपण ई साहित्य प्रतिष्ठानचे VIP सभासद झालात का?

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे.

आपल्या ओळखीच्या दहा मराठी लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

अधिक माहितीसाठी, आम्ही कोण ते जाणून घेण्यासाठी एकदातरी www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

